


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

मराठी अभ्यास परिषद पत्रिका
वर्ष ३५, अंक २, उन्हाळा २०१७

विद्वत्प्रमाणित त्रैमासिक
(Refereed Journal)

# भाषा आणि जीवन






अनुक्रमणिका

मराठी अभ्यास परिषद पत्रिका : 'भाषा आणि जीवन' विद्वत्प्रमाणित नियतकालिक
आर.एन.आय. ४००४८/८३ ISSN 2231-4059

संपादक : प्र० ना० परांजपे, एच्-1, क्लॅरियन पार्क, पुणे 411067. (M) 9422509638
इ-पत्ता : pranaparanjpe@gmail.com.

संपादन समिती : विजय पाध्ये, आनन्द काटीकर, विजया चौधरी, सरोजा भाटे, सलील वाघ

प्रकाशक, मुद्रक व व्यवस्थापकीय पत्रव्यवहार आणि वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता-
आनन्द काटीकर, बी-5/16 , सनसिटी, सिंहगड मार्ग, आनंदनगर, पुणे 411051.
संपर्क : 94216 10704 marathi.abhyas.parishad@gmail.com

मुद्रणस्थळ : भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे 411051. स्थिरभाष : (020) 24348756

प्रकाशन : त्रैमासिक : हिवाळा(जाने.), उन्हाळा(एप्रिल), पावसाळा(जुलै), दिवाळी(ऑक्टो.)

---

| वर्गणीचे दर : | वार्षिक | त्रैवार्षिक | पंचवार्षिक |
|---|---|---|---|
| व्यक्ती : | १५०/- | ४००/- | ७००/- |
| संस्था : | २००/- | ५५०/- | ९००/- |

आजीव सभासदत्व-व्यक्तींसाठी : रु २,१००/- या अंकाची किंमत : रु ४०/-

| जाहिरातीचे दर : | पूर्ण पान | अर्धे पान | पाव पान |
|---|---|---|---|
| | २,५००/- | १,५००/- | ८००/- |

---

**वर्गणी थेट बँकेत भरण्यासंबंधी सूचना :** खातेधारकाचे नाव : मराठी अभ्यास परिषद, खाते क्रमांक : 2005 716 4260 बँकेचे नाव : बँक ऑफ महाराष्ट्र, शाखा : टिळक मार्ग, पुणे **IFSC : MAHB 0000041** बँकेत वर्गणीचे पैसे भरल्यावर कृपया ९९२३६७१८२० किंवा ९४२१६१०७०४ या क्रमांकावर लघुसंदेश पाठवावा, अथवा पत्र किंवा इ-पत्र पाठवावे आणि आपले **नाव, पत्ता, वर्गणीची रक्कम, कालावधी इ० तपशील कळवावा.**



---

**सूचना :** (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या अन्य लेखकांच्या लेखांतील मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असेलच, असे नाही. (२) या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ यांच्याकडून अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ आणि राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.

# अनुक्रमणिका



मुखपृष्ठ : सलील वाघ

संपादकीय

# शब्दनिधी

- प्र. ना. परांजपे

तुकारामाने म्हटले आहे : 'आम्हा घरी धन शब्दांचीच रत्ने'

भाषेकडील या रत्नांचा खजिना म्हणजेच शब्दनिधी. हा खजिना जेवढा मोठा तेवढी ती भाषा संपन्न, समृद्ध! कोणत्याही नैसर्गिक भाषेकडील हा खजिना कधी कमी होत नाही, तो सतत वाढतच असतो. आपल्या विश्वाप्रमाणेच भाषेचा शब्दनिधी प्रत्यही प्रसरण पावत असतो. घडणाऱ्या घटना, वाटणाऱ्या भावना, विचार इ. इतरांना सांगण्यासाठी माणसाला शब्दांची गरज भासत असते आणि ते आपल्या भाषेत उपलब्ध नसतील तर तो नवीन शब्द घडवतो, अन्य भाषांतून आयान करतो, किंवा जुने शब्द नव्या अर्थाने वापरतो आणि आपली गरज भागवतो. म्हणून भाषेतील शब्दनिधी नुसताच अक्षय असतो असे नाही तर तो सतत बदलता, वाढता असतो. त्यामुळे भाषेतील शब्दांची नेमकी संख्या सांगणे शक्य नसते. मात्र एखाद्या विशिष्ट वेळी भाषेत किती शब्द आहेत यांची मोजदाद करणे आता संगणकामुळे शक्य झाले आहे.

मराठीतील शब्दांची आपल्याला ज्ञात असणारी पहिली मोजणी मोल्सवर्थच्या शब्दकोशामुळे झाली. त्या वेळी, म्हणजे १८५७ साली, मराठीतील शब्दांची संख्या साठ हजार होती हे त्या शब्दकोशाने दाखवून दिले. ओल्ड इंग्लिश (किंवा अँग्लोसॅक्सन) भाषेतही इसवी सन ७०० ते ११०० या काळात साठ हजारच शब्द असावेत असे तज्ज्ञ मानतात. पण नंतरच्या सुमारे एक हजार वर्षांत इंग्रजीतील शब्दसंख्येने दहा लाख शब्दांचा टप्पा पार केला. हार्वर्ड विद्यापीठ व गूगल यांनी २०१०मध्ये केलेल्या संयुक्त मोजणीत ती संख्या दहा लाख बावीस हजार असल्याचे आढळले. म्हणजे इंग्रजीत दर वर्षी सुमारे एक हजार शब्दांची भर पडत गेली. (एकट्या शेक्स्पियरने इंग्रजीत १,७०० शब्दांची भर घातली अशी नोंद आढळते.)

१८५७ ते १९३२ या पंचाहत्तर वर्षांत मराठीतही सुमारे सत्तर हजार शब्दांची भर पडली. य. रा. दाते आणि चिं. ग. कर्वे यांनी संपादित केलेल्या 'महाराष्ट्र शब्दकोश'च्या आठ खंडांतील (प्रसिद्धी १९३२-३८) शब्दसंख्या आहे एक लाख तीस हजार सहाशे सत्तर. या काळातील इंग्रजी शिक्षणाचा प्रसार, व्यापार व उद्योगांतील वाढ, वृत्तपत्रे व भाषांतरे यांची सुरुवात, स्वातंत्र्य चळवळ, पहिले महायुद्ध अशा घटनांमुळे शब्दसंख्येत भर पडणे साहजिक आहे. पण दाते-कर्वे यांच्या शब्दकोशानंतर सुमारे पंचाहत्तर वर्षांनी

म्हणजे २०१३मध्ये प्रसिद्ध झालेल्या सहा खंडांच्या शासकीय कोशातील शब्दांची संख्या आहे फक्त एक लाख बारा हजार! म्हणजे पंचाहत्तर वर्षांत मराठीची शब्दसंख्या वाढण्याऐवजी घटली असे म्हणावे लागेल! आणि या पंचाहत्तर वर्षांत दुसरे महायुद्ध झाले, अणुबाँबचा स्फोट झाला, भारत स्वतंत्र झाला, महाराष्ट्र राज्य स्थापन झाले, शिक्षणाचा समाजाच्या तळागाळापर्यंत प्रसार झाला, माणूस चंद्रावर पोचला, ग्रामीण, दलित, आदिवासी समूह लिहू लागले. प्रचंड शास्त्रीय प्रगती झाली - पण मराठी भाषेतील शब्दांची संख्या मात्र कमी झाली! (ही संख्या कमी का झाली याचा काहीसा खुलासा याच अंकातील आपल्या लेखात पूर्णिमा लिखिते यांनी केला आहे.)

भाषेत शब्द जितके जास्त तितकी ती भाषा संपन्न, प्रगत असे मानले जाते. म्हणूनच मराठीपेक्षा इंग्रजी भाषा अधिक संपन्न समजली जाते. शब्दसंख्या हे भाषेच्या वैभवाचे एक गमक, परिमाण किंवा एक निकष. पण भाषेच्या समृद्धीचे, वैभवाचे आणखी एक परिमाण आहे. एकाच संकल्पनेसाठी भाषेत असणाऱ्या शब्दांची संख्या हे ते परिमाण! 'बर्फ' या संकल्पनेसाठी मराठीत तीनच शब्द आहेत : बर्फ, हिम आणि गारा. कारखान्यात तयार होतो तो दगडासारखा घट्ट बर्फ. आकाशातून पावसासारखा भुरुभुरू पडणारा बर्फ म्हणजे हिम. आणि आकाशातून पावसाबरोबरच पडणारा कमीअधिक आकाराचा बर्फ म्हणजे गारा. त्यापेक्षा वेगळा प्रकारचा बर्फ मराठीला माहीत नाही. गरज पडेल तेव्हा अन्य शब्दांची जोड देऊन आपण आपले काम भागवतो. उदाहरणार्थ, बर्फाचा चुरा, किंवा बर्फाचा कीस, बर्फाचा गोळा, बर्फाचा खडा. त्यांना आपण सामासिक शब्द बनवून मराठीतील शब्दसंख्या वाढवू शकतो. उदाहरणार्थ, चुरा बर्फ, कीस बर्फ, गोळा बर्फ, खडा बर्फ इत्यादी. एस्किमो लोकांच्या भाषेत बर्फासाठी 'डझनावारी नाही तर अक्षरश: शेकडो शब्द आहेत' असे विधान फ्रान्झ बोऽझ या मानववंशशास्त्रज्ञाने १९११ साली केले आणि भाषाभ्यासाच्या क्षेत्रात खळबळ माजली. मागासलेल्या एस्किमो लोकांची भाषा इतकी समृद्ध कशी असे कोडे पडलेल्या अनेक भाषाभ्यासकांनी एस्किमो भाषांचा (भाषेचा नव्हे; कारण एस्किमोंची इन्युइट ही भाषा म्हणजे अनेक भाषांचा समूह आहे!) अभ्यास केला. त्यांना असे आढळले की त्या भाषांत मूळ शब्द किंवा धातू खूप कमी आहेत. पण त्यांना लागणाऱ्या प्रत्ययांची संख्या मात्र खूप मोठी आहे! एकाच मूळ शब्दाला वेगवेगळे प्रत्यय लावून त्या मूळ शब्दाशी संबद्ध असलेल्या गोष्टींसाठी, क्रियांसाठी आणि अर्थांसाठी जो शब्दसंग्रह किंवा शब्दखजिना तयार होतो तीच या भाषांची श्रीमंती! त्यामुळे कमीत कमी मूळ शब्दांत जास्तीत जास्त आशय व्यक्त करणे हे या भाषांचे व्यवच्छेदक वैशिष्ट्य आहे, असे म्हणावे लागते.

आपण आणि आपल्या भाषेतला शब्दसंग्रह यांच्यामधील संबंध त्रिस्तरीय असतो. आपण भाषा बोलतो, लिहितो हा आपण आणि आपली भाषा यांच्यामधील संबंधाचा

पहिला स्तर. आपण भाषा ऐकतो आणि वाचतो हा आपला तिच्याशी असलेल्या संबंधाचा दुसरा स्तर. आणि मुद्दाम शब्दकोश उघडून बघतो, त्या वेळी तिच्याशी येणारा संबंध हा तिसरा स्तर. या तीन स्तरांवर आपला ज्या शब्दांशी संबंध येतो त्यांची संख्या भिन्न भिन्न असते. सामान्य माणूस बोलतो आणि लिहितो त्या शब्दांची संख्या फार मर्यादित असते. सुमारे दोन ते तीन हजार. कसलेला वक्ता किंवा लेखक वापरतो त्या शब्दांची संख्या सामान्य माणसापेक्षा जास्त, पण मर्यादितच असते. सुमारे चार ते पाच हजार. (वेगवेगळ्या लेखकांच्या संदर्भात त्यांनी वापरलेल्या शब्दांची मोजणी करण्याचे संशोधन-प्रकल्प हाती घेता येतील.) या शब्दनिधीला क्रियावान (ॲक्टिव्ह व्होकॅब्युलरी) म्हणतात. दुसऱ्या स्तरावरील (ऐकल्यावर किंवा वाचल्यावर कळणारी, ओळखू येणारी) शब्दसंख्या यापेक्षा बरीच जास्त सहा ते दहा हजारांपर्यंत असते (ही शब्दसंख्या व्यक्तीच्या सामाजिक व शैक्षणिक पार्श्वभूमीवर अवलंबून असते.) शब्दनिधी या शब्दसंख्येला आकलन शब्दनिधी (पॅसिव्ह व्होकॅब्युलरी) म्हणतात. भाषेतील इतर सर्व शब्दांचा समावेश शब्दनिधीत होतो. भाषेच्या या तिन्ही स्तरांवरील शब्द भाषेच्या एकूण शब्दनिधीत समाविष्ट असतात.

एखाद्या भाषेचा विकास आणि त्या भाषकांचा सर्वांगीण विकास परस्परपूरक असतात आणि परस्परावलंबीही! आपल्या सर्व भावनिक, सामाजिक, आर्थिक गरजा भागविण्यासाठी आपण आपल्या भाषेचा वापर केला तरच आपली भाषा विकसित होते. भाषा विकसित होत जाते. म्हणजे तिचा शब्दनिधी संपन्न होत जातो. संपन्न ऐहिक जीवन जगण्यासाठी संपन्न आर्थिक निधीची गरज असते त्याचप्रमाणे संपन्न सामाजिक, भावनिक, इतकेच काय आत्मिक जीवन जगण्यासाठी संपन्न शब्दनिधीची गरज असते. ■

## मुद्रितशोधन

सर्वसामान्य वाचक पुस्तकाचं मुखपृष्ठ आणि मलपृष्ठ पाहून ते वाचायचं की नाही हे ठरवतो. रसिक चोखंदळ वाचक मात्र पुस्तक उघडून चाळतो. ते चाळताना काना, मात्रा, वेलांट्या, विरामचिन्हं यांचे काटेकुटे डोळ्यांना खुपले तर मात्र पुढे जायला तो राजी होत नाही. वाचक शब्दांच्या खिडकीतून अर्थात, नंतर आशयात आणि नंतर लेखकाच्या अंतरंगात शिरतो. त्यामुळे लेखकाला शब्दांची खिडकी नेटकी ठेवून वाचकाची वाट सुकर करावी लागते. हे काम मुद्रितशोधक करतो. म्हणून लेखक आणि वाचक यांमधला तो महत्त्वाचा दुवा असतो.

**- सरोजा भाटे**

# महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचा मराठी शब्दकोश - खंड १-६

- पूर्णिमा लिखिते

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळातर्फे 'एक भाषिक मराठी शब्दकोश' हा प्रकल्प २०१३ साली पूर्णत्वास गेला. याचा शेवटचा सहावा खंड (य-ज्ञ) या वर्षी प्रकाशित झाला. या कोशाची कल्पना १९७० साली महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे पहिले अध्यक्ष माननीय लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या कार्यकालात मांडली गेली. त्यापूर्वी प्रसिद्ध झालेल्या एकभाषिक मराठी-मराठी कोशामध्ये दाते-कर्वे यांनी प्रसिद्ध केलेला 'महाराष्ट्र कोश' हाच एकमेव कोश परिपूर्ण म्हणावा असा होता. याचा शेवटचा खंड (पुरवणी) १९४३ साली प्रसिद्ध झाला होता. त्यावर चाळीस वर्षे उलटून गेली होती.

१९४३ पासून १९७० पर्यंत महाराष्ट्रात अनेक बदल होत होते. मराठी भाषा राज्यपातळीवर व्यवहारभाषा म्हणून वापरली जाऊ लागली होती. मराठी शाळांतून मराठी माध्यमातून शिकवल्या गेलेल्या पुस्तकातून अनेक शास्त्रीय पारिभाषिक शब्द तयार केले गेले होते. याच काळात ग्रामीण, दलित, प्रादेशिक लेखक लिहिते झाले. अशी मराठी भाषेची सर्वांगीण वाढ होत असताना ती नोंदवून ठेवणे गरजेचे होते.

मराठी प्रमाणित भाषेचा ढंग बदलला. ऱ्हस्वदीर्घाचे नियम बदलले. हे सर्व डोळ्यासमोर ठेवून नवीन मराठी एकभाषिक मराठी कोश प्रकल्प डॉ. ना. गो. कालेलकर यांच्या संपादकत्वाखाली चालू झाला.

कोशाचा मूळ आधार दाते-कर्वे यांचा महाराष्ट्र-शब्दकोश होता. या कोशामध्ये मोल्सवर्थच्या शब्दकोशातील शब्द, अर्थाचे भाषांतर करून घेतले आहेत. शिवाय त्या काळी उपलब्ध असलेले प्राचीन, अर्वाचीन, शास्त्रीय वाङ्मय यातील शब्दही विचारात घेतले आहेत. त्याचप्रमाणे ठिकठिकाणी माणसे पाठवून प्रादेशिक शब्द-कोकणी, वऱ्हाडी, देशी इ. गोळा करून त्यांचाही अंतर्भाव या कोशात केलेला आहे.

नवीन 'मराठी शब्दकोश' करताना या शब्दांचा विचार झालाच. त्याबरोबरच १९७० व त्यानंतर प्रकाशित झालेली कथा, कादंबऱ्या (यात दलित, ग्रामीण लेखकांचाही समावेश आहे.) सामाजिक, राजकीय, विज्ञानविषयक अशी सर्व विषयांवरील निवडक पुस्तके वाचण्याचे काम हाती घेतले. तसेच पुन्हा एकदा प्राचीन मराठी वाङ्मयाचा धांडोळा घेतला. नंतर प्रकाशित झालेल्या प्राचीन मराठी वाङ्मयात महानुभावांचे प्रकाशित झालेले ग्रंथ - लीळाचरित्र १-३ व इतर साती ग्रंथ यांचाही समावेश होता. ऐतिहासिक

बखरवाङ्मयही अंतर्भूत होते. 'महाराष्ट्र शब्दकोशा'तील शब्द प्रत्यक्ष पाहून त्यात नसलेल्या शब्दांची भर यात घातली.

शब्दाची नोंद : शब्द - व्याकरण- उच्चार - सामान्यरूप - अर्थ - व्युत्पत्ती अशा प्रकारे करण्याचे ठरले होते. डॉ. कालेलकरांनी १९७८मध्ये राजीनामा दिला. त्यानंतर डॉ. वि. रा. करंदीकर, श्री. य. शं. कानिटकर हे संपादक होते. १९८७ मध्ये तज्ज्ञांतील मतभेदांमुळे कोशाचे काम बंद पडले. तोपर्यंत कोशाच्या चार खंडांची टंकलिखित प्रत तयार झालेली होती.

त्यानंतर २००७ साली महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे तत्कालीन अध्यक्ष माननीय मधु मंगेश कर्णिक यांच्या कार्यकाळात, त्यांनी या कामात विशेष आस्था दाखवल्याने कोशाचे काम परत सुरू झाले. प्राचार्य रामदास डांगे यांची संपादक म्हणून नियुक्ती झाली. त्यांच्या विचारानुसार यातील शब्दांचे सामान्यरूप व उच्चार ह्या दोन्ही बाबी वगळण्यात आल्या. याचा पहिला खंड २००९ साली प्रकाशित झाला. नंतर २०१३ पर्यंत उर्वरित पाच खंड प्रकाशित झाले.

या कोशामध्ये पूर्वीच्या शब्दसंग्रहांचा आधार घेतला आहे. शिवाय त्यानंतर प्रसिद्ध झालेले कोश-ऐतिहासिक शब्दकोश, प्राचीन मराठी कोश, ज्ञानेश्वरी शब्द भांडार, शासन व्यवहार कोश, व्यावहारिक मराठी कोश इत्यादी कोशांतील शब्दांचा समावेश करण्याचा प्रयत्न केला आहे. कोशामध्ये अर्थ लिहिताना अलीकडील प्रमाणित भाषा व शुद्धलेखन यांचा वापर केला आहे.

'महाराष्ट्र कोशा'तील काही शब्द वगळले आहेत. उदा. पर्वत, नद्या, शहरे, विशेषनामे गाळलेली आहेत. परंतु भाषाव्यवहारात ज्यांना विशेष अर्थ आहे अशी गंगा, हिमालय, कर्ण, भीम या प्रकारची नामे घेतली आहेत. प्रत्यय लागून बनलेले, जुन्या पद्यवाङ्मयात रचना-सौकर्यासाठी वापरलेले शब्द गाळले आहेत. प्राचीन मराठीत पुल्लिंगी एकवचनी शब्दाला ओ प्रत्यय लागतो. उदा. राओ, असे शब्द पुनरुक्ती दोषास्तव गाळलेले आहेत. 'महाराष्ट्र शब्दकोशा'तील म्हणी यात घेतलेल्या नाहीत. सर्व वाक्प्रचार शब्दांच्या नोंदीखाली घेतलेले आहेत. हा या कोशाचा थोडक्यात आढावा म्हणता येईल.

जी भाषा व्यवहारात वापरली जाते, तिच्यात नित्य नवीन शब्दांची भर पडत असते. काही जुने शब्द लुप्त होत असतात. त्यांचे काम कधीही पूर्ण होत नाही. हा कोश तयार करत असतानाच आणखी काही कोश - बोलीभाषेतील कोश, संकल्पना कोश, नवे शास्त्रीय वाङ्मय प्रसिद्ध झाले आहे व होत आहे. गेल्या १०-१२ वर्षांत संगणकाने व भ्रमणभाषेने आपले आयुष्य बदलून टाकले आहे. त्यामुळे अनेक नव्या शब्दांची भर पडत आहे. सामाजिक घुसळणही चालू आहे. त्यातूनही वेगवेगळे शब्द वर येत आहेत. विशेषत: वर्तमानपत्रातील शब्द. या सर्वांचा समावेश कोशात होणे

आवश्यक आहे. त्यामुळे कोश अद्ययावत होईल.

त्याचप्रमाणे महाराष्ट्रातील नद्या, धार्मिक महत्त्व असणारी शहरे यांचा समावेश परिशिष्टात करण्याची पुढील योजना होती.

वरीलप्रमाणे या कोशाचे काम झाले आहे. अर्थात एवढ्या मोठ्या कामामध्ये (शब्दसंख्या १ लाख १२ हजार) काही त्रुटी राहणे शक्य आहे. परंतु तरीही शब्दसंग्रह, अर्थ या दृष्टीने या कामाचे मोल मोठे आहे.

मी या कोशात १९७१ पासून १९८७ पर्यंत संशोधन साहाय्यक या पदावर काम करत होते. नंतर कोशाचे काम बंद पडले. पण कोशाचे काम पुन्हा सुरू झाल्यावर कोश प्रकाशित होईपर्यंत म्हणजे २००७ पासून २०१३ पर्यंत मी कोशामध्ये सहयोगी संपादक या पदावर काम केले, याबद्दल मला समाधान वाटते.

■


**पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन**

'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' (भाषा आणि जीवन) या नियतकालिकाची मालकी व इतर बाबी यांच्यासंबंधी वृत्तपत्रे आणि पुस्तकनोंदणी अधिनियम, कलम डी १९(बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली १९५६, नियम ८, नमुना ४, यांना अनुसरून केलेले निवेदन :

(१) **प्रकाशन-स्थळ :** पुणे, महाराष्ट्र

(२) **प्रकाशनाची कालनियतता : त्रैमासिक :** हिवाळा (जानेवारी), उन्हाळा (एप्रिल), पावसाळा (जुलै), दिवाळी (ऑक्टोबर).

(३) **प्रकाशक व मुद्रकाचे नाव, पत्ता :** आनन्द काटीकर, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद. बी 5/16, सनसिटी, आनंदनगर, सिंहगड मार्ग, पुणे 411 051.
**राष्ट्रीयत्व :** भारतीय.

(४) **मुद्रणस्थळ :** भंडारी मुद्रणालय, आनंदनगर, सिंहगड मार्ग, पुणे 411 051.

(५) **संपादकाचे नाव, पत्ता :** प्र. ना. परांजपे, एच्-1, क्लॅरियन पार्क, औंध, पुणे 411 067.
**राष्ट्रीयत्व :** भारतीय.

मी, आनन्द काटीकर, असे प्रतिज्ञापूर्वक सांगतो की, वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

– **आनन्द काटीकर,** कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद






अनुक्रमणिका

# लोकवैखरीचा संसार : सांकेतिक व व्यवसायनिष्ठ बोली

- फुला बागूल

**प्रास्ताविक :**

ग्रांथिक किंवा प्रमाण भाषेला समांतर अशी एक नवी भाषाव्यवस्था समुहाकडून दैनंदिन व्यवहारात उपयोजिली जाते. ही समांतर भाषाव्यवस्था सांकेतिक भाषा म्हणूनही संबोधली जाते. 'भाषा ही चिन्हव्यवस्था आहे. ही चिन्हव्यवस्था यादृच्छिक आहे', ही सैद्धांतिक विधाने सर्वपरिचित आहेत. भाषेच्या रचनेचा, तिच्या वैविध्याचा अभ्यास साक्षर समुहापुरता मर्यादित असतो. असे असले तरी भाषा ही निरक्षरांकडूनही उपयोजिली जातेच. हा निरक्षर अथवा अर्धसाक्षर समूह भाषेकडे निव्वळ संवादाचे, संज्ञापनाचे साधन म्हणूनच पाहतो. विशेषत: व्यापारी, शेतकरी, मजूर हा जो अमध्यमवर्गीय, अपांढरपेशा वर्ग आहे त्याला भाषिक संरचनेशी, तिच्या संबंधातील सिद्धांताशी काही देणे घेणे असत नाही. यामुळे भाषेच्या काटेकोर वापराकडे लक्ष द्यावे, हे त्यांच्या गावीही नसते. असे असले तरी विशिष्ट प्रसंगी मात्र तो सांकेतिक भाषा जाणीवपूर्वक योजतो. आजपर्यंत भाषेचे अभ्यासक असे मानत आले आहेत की, निरक्षर लोक भाषेच्या काटेकोर वापराबद्दल, तिच्या संरचनेबद्दल बेफिकीर असतात. मात्र हा समूह जेव्हा विशिष्ट प्रसंगी सांकेतिक भाषा जाणीवपूर्वक योजतो तेव्हा भाषाभ्यासकांचा उपरोक्त समज चुकीचा ठरतो. बैल विकणारे-घेणारे व्यापारी-ग्राहक खरेदी व विक्री-प्रसंगी भाव करताना सांकेतिक शब्द वापरतात. या मागे व्यवहार, देवाणघेवाणीचे आकडे, नफातोटा गुप्त रहावा ही व्यापारसुलभ भावना असते. या भावनेच्या संरक्षणापोटी तो सांकेतिक भाषा काटेकोरपणे योजतो.

**व्यवसायनिष्ठ सांकेतिक बोली :**

बैल खरेदी विक्री प्रसंगी योजल्या जाणाऱ्या भाषेचे, विशेषत: आकडेवारीच्या भाषेचे स्वरूप असे आहे.

| गणिती आकडा | सांकेतिक शब्द | गणिती आकडा | सांकेतिक शब्द |
|---|---|---|---|
| १ | सऱ्या | ५ | कप |
| २ | याज | ६ | ठिस |
| ३ | ढला | ७ | रात्या |
| ४ | रबा | ८ | बळल |





अनुक्रमणिका

| गणिती आकडा | सांकेतिक शब्द | गणिती आकडा | सांकेतिक शब्द |
|---|---|---|---|
| ९ | ऊना | ३० | सरनिम |
| १० | असर | ५० | निमा |
| १५ | कप असर | १०० | शिकारा |
| २० | सुती | ५०० | कपशिकारा |
| २५ | कपसुती | १००० | खिला |

अशा रीतीने प्रत्यक्ष गणिती आकडे न बोलता उपरोक्त सांकेतिक भाषेचे उपयोजन ते करीत असतात. त्यांच्या मते 'याज खिला कपशिकारा'चा अर्थ होतो २ हजार ५०० रुपये. अशा सांकेतिक भाषेतून त्यांची खरेदी विक्री चालते. या व्यापाराशी संबंधित अशा सर्वांनाच या भाषेतील शब्दांकांमागील संकेत जाणून घ्यावे लागतात. एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे अशी भाषा संक्रमित होते. इतके सगळे होत असताना अशा सांकेतिक भाषेच्या अंत:रचनेचा, व्याकरणाचा अभ्यास मात्र स्फूट लेखापलीकडे होत नाही. अशिक्षित, अर्धशिक्षिताची संख्या अजूनही दखलपात्र आहे. या समाजघटकाच्या भाषेची आबाळ होऊ नये. तिचे संरक्षण झाले पाहिजे.

जी गोष्ट बैलविक्रीशी संबंधित लोकसमुहाच्या भाषेची, तीच गोष्ट मटका खेळणाऱ्या, मटका व्यवसायाशी संबंधित लोकांच्या भाषेची आहे. मटका खेळणारी व्यक्ती बहुतांशी अल्प रोजगार मिळविणारी, अशिक्षित, अर्धशिक्षित अशी आहे. मटक्याशी संबंधित लोकांची संख्याही मोठी आहे. फार मोठा वर्ग मटका आणि त्याच्याशी निगडित व्यवसायनिष्ठ भाषेचे उपयोजन करीत आहे.

मटका-व्यवसायात उपयोजित शब्दांक मजेशीर आहेत.

| गणिती आकडा | सांकेतिक शब्द | गणिती आकडा | सांकेतिक शब्द |
|---|---|---|---|
| ० | मेंढी | ६ | छगन |
| १ | एकनाथ | ७ | लंगडा |
| २ | दुर्गामाय | ८ | बठड |
| ३ | तिरुपती | ९ | न्हाई |
| ४ | खाटलं | | |
| ५ | इंदिरागांधी | | |

गुजराथी भाषेत शून्यास 'मिंढी' म्हणतात. उपरोक्त कोष्टकात शून्यास 'मेंढी' म्हटले आहे. '१' या आकड्यास एकनाथ, '२' आकड्यास दुर्गामाय, '३' या आकड्यास तिरुपती/तिर्री हे शब्द काहीसे नैसर्गिक, तार्किक वाटतात. त्यांच्या उच्चारांवरून ते बनवले गेलेले वाटतात. मात्र ४,५,६,७,८ ह्या शब्दांकांसाठीचे शब्द मात्र पूर्णपणे वेगळे आहेत. त्यातही काँग्रेस पक्षाचे चिन्ह (पंजा) म्हणून '५' या आकड्यास इंदिरा गांधी म्हटले जाते, हेही एकवेळ समजून घेता येईल. नऊवरून न्हाई (न्हावी) हेही समजून घेता येईल. '४' या आकड्यास 'खाटलं' म्हणण्याचे एक कारण असे संभवते की खानदेशात 'खाटलं' म्हणजे बाज. (असेल माझा हरी तर देईल खाटल्या वरी!) बाजेला चारपाय असतात म्हणून '४' या आकड्यास खाटलं म्हणत असावेत. ६ या आकड्यास 'छगन' म्हणण्याचे कारण असे दिसते की, वेडसर, विक्षिप्त व्यक्तीस छगन म्हटले जाते. 'सात' आकड्यास 'लंगडा' म्हणण्याचे कारण असे की '७' हा अंक इंग्रजीत 7 असा लिहितात. त्याचा आकार लंगड्याच्या काठीसारखा असतो. अशा काठीसदृश्य अंकास 'लंगडा' म्हणत असावेत. भाषेत नव्या शब्दांची भर घालणाऱ्या या लोकांना शिक्षण, भाषाभान नाही. त्यांची ही भाषेतील भर निश्चितच लक्षणीय आहे.

**व्यवसायविशिष्ट भाषा :**

जुगार, पानटपरी, गिर्यारोहण, लग्न, दूरदर्शन मालिका इ. नव्याजुन्या व्यवसायांत विशिष्ट शब्दांचे सातत्याने उपयोजन होतांना दिसते. जुगारी लोकांच्या तोंडी झन्नामन्ना, तीनपत्ती, मांगपत्ती हे शब्द येतात. तीनपत्ती या पत्त्याच्या खेळात प्रत्येकी तीन पत्ते वाटले जातात. त्यांचा सुयोग्य असा वरचढ ठरणारा क्रम लावावा लागतो. त्यात 'ट्रिपल' म्हणजे तीनही पत्ते सारखेच तीन राण्या - तीन राजे वगैरे, त्यानंतर 'सीटी' म्हणजे तीनही पत्ते एकाच प्रकारे व लागोपाठच्या क्रमाने असावे लागतात. म्हणजेच बदामचे लागोपाठ क्रमाचे ४,५,६ हे पत्ते. सीटीनंतर 'दादरा'चा क्रम लागतो. दादरा म्हणजे कोणत्याही प्रकारचे पत्ते. मात्र चढता/उतरता असा पत्त्यांचा क्रम हवा असतो. दादरा नंतर 'कलर'चा क्रम असतो. तीनही पत्ते एकाच प्रकारचे असावे लागतात. कलरनंतर 'डबल'चा नंबर लागतो. यात तीनपैकी कोणतेही दोन पत्ते सारखेच असावेत लागतात. उदा. दोन राजे, दोन राण्या.

'मांगपत्ती' या खेळात समोरचा भिडू एका कुठल्याही पत्त्याचे नांव सांगून पत्ते टाकायला सांगतो. एका अर्थाने तो हवा तो पत्ता मागतो. म्हणून खेळाचे नाव 'मांगपत्ती'. एक पत्ता स्वत:ला व दुसरा पत्ता समोरच्या भिडूला असे पत्ते वाटले जातात. हवा तो पत्ता वाट्याला आला की समोरचा भिडू जिंकतो.

पत्त्यांच्या खेळात/जुगारांत 'डबा' हा खेळ असतो यास 'रमी' असेही म्हणतात- यात प्रत्येकी तेरा पत्ते वाटले जातात. त्यात ४-३-३-३ असा पत्त्यांचा क्रम लावावा





अनुक्रमणिका

लागतो. त्यातल्या पहिल्या ४ पत्त्यांच्या जोडास 'पक्की' म्हणतात. त्यात एकाच प्रकारचे लागोपाठ क्रमाचे चार पत्ते जुळवावे लागतात. उदा. ५,६,७,८ क्रमांकाचे पत्ते. पत्त्यांच्या क्रमांकास खालील शब्द आहेत.

| गणिती आकडा | सांकेतिक शब्द | गणिती आकडा | सांकेतिक शब्द |
|---|---|---|---|
| १ | एक्का | ८ | आठ्ठा |
| २ | दुर्री | ९ | नव्वा |
| ३ | तिर्री | १० | दस्सा |
| ४ | चौका | J (Jack) | गुलाम/भडं/व्हन्डं/भाड्या |
| ५ | पंजा | Q (Queen) | राणी/रांड/रंडी |
| ६ | छक्का | K (King) | राजा/बादशाह |
| ७ | सत्ता | | |

याखेरीज पत्त्यांच्या प्रकारात खालील शब्द योजले जातात.

| इंग्रजी शब्द | व्यवहारातले नाव |
|---|---|
| Club | किलवर |
| Spade | इस्पिक |
| Heart | बदाम |
| Diamond | चवकट/चौकट |

'पानटपरी' या व्यवसायातही विशिष्ट शब्दांचा वापर लोकांकडून होत असतो.

| वस्तू/पदार्थ | व्यवहारातील शब्द |
|---|---|
| गोड सुपारी | नखराली/बाबू |
| सुगंधी सुपारी | शाहरुख |
| पिवळ्या रंगाची सुपारी | कॉकटेल |
| बडीशेप | सुगम |
| सुपारी+तंबाखु+ चुना यांचे घोळलेले मिश्रण | बार (महानगरात)<br>फाकी (ग्रामीण भागात - खानदेशात)<br>खर्रा (विदर्भात) |
| चुना+केमिकल पावडर+तंबाखू | वाकडी |

गिर्यारोहण आणि पाणीखेळ हेही आता व्यवसायरूप घेऊ लागले आहेत. त्यांचे व्यावसायिक प्रशिक्षक आता उदयास आले आहेत.

'पाणीखेळ' या क्रीडा-व्यवसायात खालील शब्द उपयोजिले जात आहेत.

| खेळाचा तपशील | संज्ञा |
|---|---|
| समुद्रतळाशी जाणे | स्कूबा डाइव्हिंग |
| तराफ्यावरून नदी ओलांडणे | रीव्हर राफ्टींग |
| स्कीवरून बर्फावरून घसरणे | स्किइंग |

साहसी क्रीडा-प्रकारांत खालील शब्द उपयोजिले जात आहेत.

| स्वरूप | संज्ञा |
|---|---|
| तंबूत राहणे | कॅम्पिंग |
| हवाई छत्रीने उंचावरून झेपावणे | पॅराग्लाइडिंग |
| लांब, लवचीक दोर कंबरेला बांधून उंचावरून उडी घेणे | बंजी जंपिंग |
| अयांत्रिक त्रिकोणाकृती पंतगाच्या साहाय्याने हवेत भरारी घेणे | हॅंग ग्लायडिंग |
| गरम हवेच्या फुग्याच्या साहाय्याने विहार करणे | हॉट एअर बलूनिंग |
| अरण्यवास, वनप्रवास | जंगल सफारी |

गिर्यारोहणाच्या क्षेत्रात खालील शब्द वापरले जातात.

| | |
|---|---|
| कडेकपारी चढणे | ट्रेकिंग |
| खडक चढणे | रॉक क्लाइंबिंग |
| वनविहार/भटकंती | हायकिंग |

लग्न उद्योगाने करिझ्मा आल्बम, डीजे, लॉन, व्हिडीओ शुटींग हे शब्द आणले आहेत.

फूडस्टायलिंग या नव्या व्यवसाय-क्षेत्रात पुढील शब्द उपयोजिले जात आहेत.

| बल्लवाचार्य | शेफ |
|---|---|
| मोठे स्वयंपाक गृह (मुदपाकखाना) | बल्क किचन |
| मांसाहारी जिन्नस साफ करण्याची जागा | बुचरी |
| भाज्यांची पूर्वतयारी | व्हेज प्रेप |
| थंड पदार्थ बनविण्याची जागा | गार्द मॅंजेर |





अनुक्रमणिका

पिणाऱ्यांच्या तोंडी सिग्नेचर, ऑफिसर्स चॉईस, बिअर, व्होडका, ब्रँडी, व्हिस्की, पाइंट, क्वार्टर, रम, वाइन इ. शब्द रुळले आहेत. नोटबंदीने अर्थव्यवसायात नव्याच शब्दांची भर घातली. उदा. निमौद्रीकरण, चलनजाच, निश्चलनीकरण, चलन आक्रांत, चलन कल्लोळ.

यांपैकी निमौद्रीकरण, निश्चलनीकरण, हे शब्द प्रक्रियासुसंगत आहेत. मात्र चलनकल्लोळ-चलनजाच-चलनआक्रांत हे शब्द जनतेच्या त्रासदायक अनुभवाची उत्स्फूर्त शब्द-अपत्ये आहेत.[२]

मालिका-व्यावसायिकांनीही इंग्रजी शब्दांना रसिकांच्या मानगुटीवर बसवले आहे. यात सेलिब्रेटी, सेल्फी, अँकर, रिॲलिटी शो, प्राइम टाइम, फूल टू कडक, कॉमेडीची बुलेट ट्रेन, बिग बॉस, इ. शब्द येतात.

## समारोप

अशा रीतीने लोकवैखरीच्या अतिव्याप्त संसारातील सांकेतिक बोलीचे व नवनव्या व्यवसायक्षेत्रांनी आणलेल्या व्यवसायनिष्ठ भाषेचे स्वरूप आहे. सांकेतिक बोलीतील शब्द मात्र मुळीच इंग्रजी वळणाचे नाहीत. नव्या व्यवसाय-क्षेत्रातील व्यवसायनिष्ठ भाषेतील शब्द मात्र पूर्णपणे इंग्रजीच आहेत. प्लंबिंग क्षेत्र, माध्यमक्षेत्र, ब्युटीपार्लर, आरोग्यक्षेत्र, विज्ञानतंत्रज्ञानाचे क्षेत्र, सेवाक्षेत्र आदि क्षेत्रांतील व्यवसायनिष्ठ भाषेचा शब्दसंग्रह पूर्णपणे इंग्रजी असण्याचे तोटेही संभवतात. आधीच इंग्रजी माध्यमाकडे झालेला कल, मराठी माध्यमाच्या शाळांची दुरवस्था, यांसारख्या अनेकविध कारणांनी मराठीच्या अस्तित्वाचे प्रश्न निर्माण केले आहेत. तशातच या नव्या क्षेत्रांनी आणलेल्या इंग्रजी पारिभाषिक शब्दांचा वाढणारा राबता पाहता मराठी भाषा-प्रेमींना चिंता वाटणे साहजिकच आहे. ■

### स्वागत

( १ ) 'टाळलेल्या कविता', सलील वाघ, प्रकाशक : टाईम अँड स्पेस कम्युनिकेशन्स, पुणे ११, पृष्ठे : ६०. किंमत रु. २००/-

( २ ) 'कविता-रती', (पुरुषोत्तम पाटील आदरांजली विशेषांक), पृष्ठे : १३७, किंमत : उल्लेख नाही.

( ३ ) 'अहिराणीच्या निमित्ताने : भाषा', लेखक : डॉ. सुधीर रा. देवरे, प्रकाशक : पद्मगंधा प्रकाशन, पुणे, पृष्ठे : १५१, किंमत रु. १६०/-

( ४ ) 'अहिराणी वट्टा', लेखक : डॉ. सुधीर रा. देवरे, प्रकाशक : पद्मगंधा प्रकाशन, पुणे, पृष्ठे : १७६, किंमत रु. २००/-

# भाषा अहिराणी

- सुधीर रा. देवरे

उत्तर महाराष्ट्रातील खानदेशात बोलली जाणारी प्रमुख भाषा ही अहिराणी भाषा आहे.

पूर्वी घरात, मित्रांत, नातेवाइकांत, बाजारात, दुकानात, दैनंदिन व्यवहारात, शेती-व्यवहारात सर्वत्र अहिराणी भाषा बोलली जायची. घरात पूर्णपणे अहिराणी संभाषण होत असे. कारण खानदेशातली अहिराणी ही लोकभाषा आहे; खानदेशाची प्रमाणभाषा अहिराणी आहे.

त्या काळातल्या प्राथमिक शाळेतला शिक्षक असो की माध्यमिक शाळेतला, शाळेतून बाहेर पडला की तो/ती घरी-दारी अहिराणी भाषा बोलायचा/ची. शाळेत विद्यार्थ्यांनीही आपसात अहिराणी बोलायला हरकत नसे. मात्र शिक्षक आणि विद्यार्थी एकमेकांशी मराठीत बोलत. आपसात बोलण्यासाठी विद्यार्थ्यांना मराठीची सक्ती नव्हती. घरात आणि नातेवाइकांत नैसर्गिकपणे अहिराणी भाषा बोलली जायची.

पुढे पुढे केव्हातरी भाषेबाबत न्यूनगंड बळावत गेला. भाषेच्या शुद्ध-अशुद्ध स्वरूपावर चर्चा होऊ लागली. बोलीभाषा बोलणाऱ्यांना गावंढळ संबोधलं जाऊ लागलं. कोणाकडून भाषेतले उच्चार नीट होत नसले तर हिणवलं जाऊ लागलं. घरी बोलीभाषेत बोलणारा शिक्षक शाळेत येताच बळजबरी तथाकथित 'शुद्ध' भाषा बोलण्याचा प्रयत्न करू लागला. आणि एखाद्या विद्यार्थ्याच्या तोंडातून चुकून बोलीतला शब्द निघाला की तो शिक्षक त्या विद्यार्थ्याला चिडवत त्याचा अपमान करू लागला. अशा पायरीपायरीने होणाऱ्या बदलात शाळेत गेलं की विद्यार्थ्याने मराठीच बोललं पाहिजे, अशी आचारसंहिता केव्हा तयार झाली हे कोणालाच कळलं नाही.

शाळेत कोणी विद्यार्थी चुकून अहिराणी बोलला तर तो चेष्टेचा विषय होऊ लागला. हिणवला जाऊ लागला. अहिराणी बोलणं ही बाब न्यूनगंड तयार करू लागली. हे सर्व भयानक आहे हे कोण कोणाला सांगेल, अशी परिस्थिती होती. 'इथे अहिराणी बोलण्यास सक्त मनाई आहे.' अशा इकडच्या काही सरकारी कार्यालयात पाट्यासुद्धा लावल्या गेल्या. आणि अशा अनेक कारणांनी खानदेशातील बऱ्याच लोकांनी अहिराणी बोलणं सोडलं.

खानदेशातल्या अहिराणीप्रमाणेच त्या त्या भागातल्या बोलीभाषांवरही दबाव येऊन भाषा अस्तास जायला लागल्या. यामुळे बोली भाषांची अतोनात हानी झाली. हा मधला

काळ सोडला तर त्यानंतर भाषाशास्त्राचे वारे शिक्षण क्षेत्रात आले हे नशीब. विद्यार्थ्याला त्या त्या बोलीभाषेत शिक्षण दिलं गेलं पाहिजे हे कुजबुजत मान्य होऊ लागलं. आणि मग ही प्रमाणभाषेची आचारसंहिता नष्ट होऊ लागली. पण ह्या गोष्टीला खूप उशीर झाला होता. या आधीच्या न्यूनगंडामुळे बोलीभाषांचं जे नुकसान झालं ते पुढे भरून आलं नाही.

या अशा आणि न्यूनगंडांच्या अनेक कारणांमुळे आज अहिराणी भाषेतून मूळ अहिराणी शब्द लुप्त होत आहेत. आज अनेक अहिराणी शब्दांची जागा इंग्रजी व मराठी शब्दांनी घेतली आहे. अहिराणीच्या बाबतीत जे घडलं ते सगळ्याच बोलीभाषांच्या वाट्याला आलं.

नाशिक जिल्ह्यातील पूर्व भाग, धुळे, नंदुरबार, जळगाव (पश्चिम भाग) या चार जिल्ह्यात अहिराणी भाषा बोलली जाते. खानदेशातली अहिराणी ही लोकभाषा असून याच पट्ट्यात अहिराणीच्या काही पोटभाषा आढळतात. बागलाणी, नंदुरबारी, खानदेशी, खाल्यांगी, वरल्यांगी अशा या काही अहिराणीच्या पोटभाषा आहेत. अहिराणी परिसरात काही जाती-जमातीय भाषाही बोलल्या जातात. भावसारी, तावडी, पावरी, भिल्ली, मावची, गुर्जरी, लेवापाटीदार, देहवाली, कोकणा, वारली, ठाकर, लाडशिक्की, घाटकोकणी आदी बोलीही बोलल्या जात असल्या तरी या सर्व पोटभाषांवर अहिराणी भाषेचा पगडा दिसून येतो.



## कलावंतांची जबाबदारी

आयुष्यभर आर्थिक असुरक्षिततेच्या सावटाखाली असूनही भारती स्वत:ला मात्र लोककवी मानत. याविषयी १९१६मध्ये त्यांनी लिहिलेल्या लेखनातील एक परिच्छेद उद्‌बोधक आहे. त्यांनी लिहिले, ''जगभर राजेरजवाड्यांच्या आश्रयाखाली विविध कला जोपासण्याचे दिवस आता सरले आहेत. आपण आता जनतेच्या आश्रयाला गेले पाहिजे. कलेला समर्थन आणि मदत आता सर्वसामान्य जनतेकडून येईल. चांगल्या कलेची आवड जनतेमध्ये निर्माण करण्याची जबाबदारी कलावंतांची आहे.''

**- रामचंद्र गुहा, साधना, ७ जुलै २०१८**

# कोकणी कुणबी स्त्रीचे उखाणे आणि लोकसंस्कृती

**- निधी पटवर्धन**

लोकवाङ्मयाचे अंतरंग ओव्या, उखाणे, म्हणी, कहाण्या, गाणी, लोककथा, कोडी इत्यादी अनेक प्रकारांनी सजले आहे. या वाङ्मयामुळे समाजाची संस्कृती, भावना, समजुती वगैरे बाबतची कल्पना निश्चित करणे सोयीचे होते. स्त्री-वर्गाकडून रचना झालेल्या लोकवाङ्मयाची भाषा प्रामुख्याने घरगुती, साधीभोळी, जिव्हाळ्याची असते. खेडोपाडीच्या चालीरीतींनी सजलेल्या लोकसंस्कृतीचा एक प्रभावी आणि लोकप्रिय आविष्कार म्हणजे उखाणा. दैवतकथेप्रमाणेच हा प्राचीनप्रकार आहे. ऋग्वेदातही उखाणा आढळतो. महाराष्ट्रात तर उखाणे घालण्याची आणि घेण्याची चाल फार जुनी आहे 'ज्ञानेश्वरी'त आणि एकनाथांच्या 'रुक्मिणी-स्वयंवरा'तही उखाण्याचा उल्लेख आढळतो. उखाण्याला संस्कृतात 'प्रहेलिका' म्हणतात. ब्रह्मोद्य, प्रश्न, कूट हे त्याचे प्रतिशब्द. मराठीतही आहाणा, कोहाडा, उमान किंवा उमाण हे प्रतिशब्द आहेत. खेळताना वा लग्नादी कार्यात रचून म्हटलेल्या ठसकेदार शाब्दिक तुकड्याला 'उखाणा' म्हणतात. उखाणे स्त्री-जीवनाशी निगडित असल्यामुळे साहजिकच स्त्री-विशिष्ट भावभावनांना त्यांतून वाट मिळालेली असते.

लहानसहान पण यमकबद्ध अशी वाक्यरचना करीत स्त्रिया चित्ताकर्षक बोलतात. कधी हे बोलणे आटोपशीर तर कधी लांबलेलेही असते. मंगलप्रसंगी पतीचे नाव घेताना, लावणी, सण, संस्कार अशाप्रसंगी उखाणे घेण्याची प्रथा आहे. कोकणातल्या, विशेषत: कुणबी स्त्रियांच्या विविध प्रश्नविरहित उखाण्यांद्वारे तेथील लोकसंस्कृतीचा परिचय करून घेण्याचा हा एक प्रयत्न आहे.

कुणबी स्त्रियांमध्ये पतीचे नाव घेण्याचे म्हणून जे खास उखाणे असतात ते मोठे वैशिष्ट्यपूर्ण असतात. त्यात नवऱ्याचे नाव घेण्यापूर्वी एखादी मजेदार हकिगत असते, त्यात नातीगोती, सणवार, चालीरिती, देवादिक, फळेफुले(निसर्ग), इतिहास-भूगोल वगैरे अनेक गोष्टींचा उठावदार संगम असतो. सामाजिक जीवनाचे दर्शन घडविणारा एक वाङ्मयप्रकार म्हणूनही उखाणा महत्त्वपूर्ण ठरतो. पतीचे नाव घेण्याचे उखाणे हे प्रश्नविरहित उखाण्याचे उत्तम उदाहरण आहे. कुणबी स्त्रिया नवऱ्याचे नाव उघडपणे घेत नाहीत. नाव घेतले तर पतीचे आयुष्य कमी होते असे त्या मानतात. उलट उखाण्यात नाव गुंफून घेतले तर कसलाच बाध येत नाही असाही परंपरागत समज आहे. या उखाण्यांमध्ये त्यांच्या पारंपरिक जीवनाचा संदर्भ दडलेला असतो. ज्या नैसर्गिक कोकणच्या

परिसरात ही स्त्री राहते, त्या परिसराशी तिचे निकटचे नाते उखाण्यातून स्पष्ट होते.
उदा :

( १ ) कोकणात पिकतात फणस, आंबे, काजू,
*** नाव घ्यायला मी कशाला लाजू?

( २ ) अबोलीच्या वेणीतली फुले झाली घट्ट
*** भरतारांचे नाव घेते, अक्काबाईचा हट्ट

( ३ ) घ्या अंतराची फनी, घ्या कुडसुडाची वेनी
कुडसुडाच्या वेनीला कल्या तीनसेसाट
*** रायांच्या पलंगी करते हळदीकुंकवाचा थाट

( ४ ) फनस काडला ढोसलून, भाजी केली किसलून
पैशाची आनली लसून, फोडनी दिली बसून
*** भरतार गेले रुसून, त्यांना आनलं पालकीत बसवून

या उखाण्यातून तिचा परिसर फळे, फुले यांचा निर्देश होतो.

( १ ) चंदनाची चौकड, रुप्याचं कुलूप
आत वाकून पाते(पहाते)त, जिरेसालीचा भात
भातावर तूप, तुपासारखं रूप
रूपासारखा जोडा, गळ्यात पडला वेडा(मंगळसूत्र)
*** रायांचा जोडा, पंढरीला धाडा

( २ ) अजघर-मजघर, मजघरात खोली,
खोलीत पेटी, पेटीत ताट
ताटात लाडू, *** भरतार चला एकादशी सोडू

( ३ ) चांदीची कलसी, गुलालाने घासली
*** रायांचे नाव घेते, तिथं इटुरकुमाय हसली

कुणबी लोक 'नागपंचमी' मोठ्या प्रमाणावर साजरी करतात. वारुळाची पूजा करतात. त्याचबरोबर गौरी, गणपती, शिमगा हे सण त्यांचे मुख्य सण आहेत. नागपंचमीपासून सुरू होणारे सण अक्षयतृतीयेपर्यंत विविध प्रकारे साजरे होतात. हे कसे साजरे होतात हे एका जानपद उखाण्यातून सांगता येते.

कांडून-कुटून केला गोला
पंचमीने उघडला डोला
पंचमीला केले कानिवले, गणपती देव माणिवले

गणपतीला केली सोजी, आली गवर राजी
गौरीला केली डाल, आला दसरेमाल
दसरेमालाला लुटू सोनं, दिवालीचं झालं येनं
आली दिवाली नेनती, दिवालीला पाजलतो पनती
आली संक्रांत लाडी, संक्रांतीला पुजतो करा
बेंदरापत्तर धीर धरा
बेंदरापत्तर पुजले पाट, शिमगा आला जग्गरदाट
शिमग्याला पुजू खेल, पाडवा आला चक्रघन
पाजव्याला पुजू गुडी, महिन्यानं आली आकेती लाडी
आकेतीला पुजू बैल, मग गाडीघोड्याचं जान होयल
तेव्हा * * * रायांचं येनं होयल.

सणासुदीबरोबरच कुणब्यांचे बैल, खाण्यापिण्याच्या पद्धतीही त्यांच्या उखाण्यांत येतात. पूर्वी आमतं (आंबट) शिंक्यात ठेवून सकाळी न्याहरीला आंबील असे. त्याचा उल्लेखही पुढील उखाण्यात येतो. कानिवले, सोजी, डाल(पुरण) हे पदार्थही मागच्या उखाण्यात आपण पाहिले.

शेट शेटीचं, बैल घाटीचं
बैल नव धनी, सवासे गोनी
आल्या आल्या कंलवातनी
आल्या त येव देत
नंगर म्हाली जाव देत
नंगर नव म्हाल, चाबकाचा मार
वाट होती देवळी, तीत टाकला पैसा
उरलंसुरलं शिंक्यात
शिंकं गेलं तुटून
आमतं केलं फुटून
व्हार गेला जैतापुरात
जैतापूरच्या बायका, नाव घेतय ऐका
सोन्याची शिपली, मोत्यानी गुंफली
* * * भरताराची अस्तुरी खेलाया गुतली

अशाप्रकारे एखादी मजेदार हकिकत नवऱ्याचे नाव घेण्याच्यापूर्वी उखाण्यापूर्वी आलेली असते. काही उखाण्यातून तिच्या वेशभूषेचे, दागिन्यांचेही दर्शन घडते.

(१) दारी होता हरभरा
पानी जात झरझरा
सासू बा सुंदरा
मामंजी सरदारा
सून जाते माहेरा
जाते त जाव दे
बाल्या-बुगड्या लेव दे
बाल्या-बुगड्यांना झुबं (मुके घुंगूर)
सत्यनारायनाच्या पुंजेला
*** भरतार उबं (उभे)

(२) चांदीच्या काट्याला घागऱ्याचा (घुंगूराचा) घोस
*** रायाच्या नावासाटी आलो शंबर कोस

फुगडीच्या उखाण्यात ---

(१) काला कासोटा धरनी लोलतो
शनवारचा मारुती चक्र खेलतो
चक्र खेली तल्यात नि
हजाराची कंठी माज्या बंधूच्या गल्यात

(२) अलंगावर पलंगी, त्यावर टाकली सरी
कासेला निरी ती कसबीन खरी

तिचे कासोट्याचे लुगडे नेसण्याची पद्धत, कासोट्याला निरी येण्यातील तिचे कौशल्य आदीबाबत मनोरंजकपर माहिती मिळते, तर बाल्या, बुगड्या, अंबाड्यात रोवायचा काटा, कंठी, सरी या अलंकारांबाबतही माहिती मिळते. कधी या उखाण्यातून विनोदाचा शिडकावाही केलेला आढळतो.

(१) किरलीबीई किरली तवश्याची किरली (तवसे-मोठी काकडी, किरली-करंगळी एवढी काकडी) दादानं बायको केली देशातली मुरली (चटकचांदणी)

(२) चुच बाई चुच देवळावाटला चुच
दादानं बायको केली आपल्यापेक्षा उच

(३) शिडी बाय शिडी लाकडाची शिडी
वयनी कं पावना आला दाराला कडी

शहरीकरणाबरोबरच लोकसंस्कृती कात टाकत असते. तसं पाहिलं तर कोणतीही संस्कृती स्थिररूप नसतेच. ती सतत परिवर्तन पावत असते. स्वातंत्र्यलढ्याच्या कल्पना

सांगणारे, स्वातंत्र्यसंस्कृतीने प्रेरित झालेले उखाणेही दिसतात. उदा.

( १ ) इंग्रजांच्या सत्याग्रहासाठी गांधीजींनी त्याग केला
--- रायांचं नाव घेते, जन्माजन्मासाठी हात दिला.

( २ ) लालबहादूरशास्त्री मेले, स्वर्गाला गेले, इंदिरा गांधीनं केली तार
--- रायांच्या जीवावर लेते मंगळसूत्राचा हार

( ३ ) आकाशातून पडला दराक्षाचा घोस
त्यात जलमले सुभाषचंद्र बोस
सुभाषचंद्र बोसांनी काडलं हटील
त्यात लागला नाना पाटील
नाना पाटलानं केली कमाल
* * * रावांच्या हातात स्वदेशी रुमाल

यानंतरच्या काळातले उखाणे बदललेले दिसतात. पूर्वीच्या जुन्या-चालीरीतीच्या कुणबी स्त्रिया अजूनही हे सर्व उखाणे घेतात. मात्र सध्याच्या पिढीतील उखाणे बदललेले, पुस्तकी बनलेले आहेत.

कुणबी लोकांमध्ये उणीदुणी, चेष्टा, झिम्मा, फुगडी खेळताना जरूर आढळेल. मात्र मानपानाच्या बाबतीत ह्या स्त्रिया जागरूक आहेत. ह्या स्त्री-जगतात एकंदर बोलाचालीने होणारा होणारा मानपान, आहेर मोलाचा ठरत असतो. उखाण्यात वापरण्यात येणाऱ्या भाषेवरून, कल्पनांवरून माहेरचे मोजमाप होते. माहेरी शिकलेले मुलगी सासरी गिरवते, म्हणून उखाणे मोलाचे ठरतात. खेळकर विचारातून आणि चटकदार भाषेतून हे संस्कारधन पुढच्या पिढीकडे पाठवले जाते.

कण कण कुदळी, मन मन माती
उभारल्या भिंती, सासुबायचे पोटी
अक्काबायचे पाटी, जलमले राम
राम नाय म्हटलं, नाव नाय घेतलं
बत्तीस सुपाऱ्या, बत्तीस पान, लावला चुना
खाल्लं पान, रंगलं तोंड, तोंडात विडा, बोलू कशी
गळ्यात कंठी वाकू कशी, पायात पैंजण, चालू कशी
सदर सरशाची, नदर पुरूषाची, फूल जाईचं, दूध गाईचं
बहीण भावाची, पोळी गव्हाची
नात झेपल्यांची, लेक परशरामाची
सून खंडागळ्यांची, अस्तुरी बुधाजी भरताराची





अनुक्रमणिका

असे उखाण्यांनी जुळवलेले व सांभाळलेले वाडवडिलार्जित ऋणानुबंध हाच या स्त्रीसाठी मौल्यवान ठेवा असतो.

कुणबी स्त्रियांच्या लावणी, पेरणीच्या गाण्यांतूनही कोकणी संस्कृती दिसते. त्यांची गाणी हा अभ्यासाचा वेगळा विषय होऊ शकतो. हे उखाणे यापूर्वी कागदावर आले नाहीत, पण या स्त्रियांच्या वाणीवर खेळले. कुठच्या भुर्जपत्रावर किंवा शिलालेखावर कोरले नाहीत, पण स्त्रीहृदयावर कोरले गेले आणि त्यामुळेच ते विस्मृत न होता आजही कोकणी मुखामध्ये रेंगाळत आहेत. वाणीवर खेळत खेळत पिढ्यानपिढ्या चालत आले आहेत, हा मोठाच लाभ म्हणायला हवा.

**संदर्भ :**


(१) बाबर, सरोजिनी, 'जा माझ्या माहेरा', महाराष्ट्र राज्य लोकसाहित्यमाला

(२) बाबर, सरोजिनी, (संपा.) - 'वनिता सारस्वत', समाजशिक्षण प्रकाशन, १९६१

(३) भारतीय संस्कृतीकोश, खंड १ला

(४) डॉ. व्यवहारे, शरद, 'लोकसाहित्य' (संकल्पना व स्वरूप), कैलाश पब्लिकेशन्स, औरंगपुरा, औरंगाबाद. ■


## कलाकृतीवरील स्वामित्वहक्क

काही पाश्चिमात्य देशांत लेखकांच्या कृतींवरील स्वामित्वहक्क (कॉपीराईट) त्यांच्या मृत्यूच्या पंचाहत्तर वर्षांनंतर संपुष्टात येतात. भारतात मात्र हा कालावधी काहीसा कमी म्हणजे साठ वर्षांचा आहे. त्यामुळे २००१ पर्यंत रवींद्रनाथ टागोरांच्या लिखाणावर शांतीनिकेतनचा आणि २००८पर्यंत महात्मा गांधींच्या लिखाणावर नवजीवन प्रेसचा स्वामित्व हक्क होता. अशाच प्रकारे जवाहरलाल नेहरूंच्या लिखाणावर मे २०२४ पर्यंत सोनिया गांधींचा हक्क असणार आहे.

या नियमांचा सर्वांत उल्लेखनीय अपवाद मद्रास राज्यात (तामिळनाडूचे पूर्वीचे नाव) घडला. १९४९मध्ये मद्रास राज्याने सुब्रह्मण्यम् भारतींच्या लेखनाचे स्वामित्व हक्क अधिग्रहित केल्याचे जाहीर केले. त्यानंतर पाच वर्षांनी राज्य सरकारने जनतेसाठी हे हक्क सोडले, जेणेकरून कोणत्याही व्यक्तीला भारतींचे लेखन छापणे, किंवा त्याचे गाण्यात रूपांतरण करणे, किंवा त्यावर चित्रपट बनवणे इत्यादी गोष्टी कायद्याच्या कोणत्याही आडकाठीविना करता येणे शक्य झाले.

- रामचंद्र गुहा, साधना, ७ जुलै २०१८

# एकार्थक जोडशब्द

- अ. द. मराठे

मराठी भाषेत एकाच अर्थाचे दोन शब्द जोडीने वापरण्याची पद्धत रूढ आहे. इंग्रजीतही ही पद्धत प्रचलित आहे. उदा. होल एन् सोल, काम एन् क्काएट, प्रीस्टाईन प्युअर, ट्रुफॅक्ट इ. भिन्नभाषी राज्यकर्ते आले की जितांना जेत्यांची भाषा आत्मसात करावी लागते. अशा वेळी परकी भाषेतील शब्द आणि त्याच अर्थाचा देशी भाषेतील शब्द अशा जोड्या भाषेत रूढ होतात. त्यांना भाषांतर समास म्हणतात. मराठींत रूढ झालेले काही भाषांतर-समास असे आहेत. त्यांचे पहिले पद अरबी, फारसी, तुर्की यापैकी एका भाषेतील आहे. या तिन्ही भाषा मला पूर्णपणे अज्ञात आहेत. मात्र या तीन भाषा आणि भारतीय प्रादेशिक भाषा यांच्या संकरांतून उर्दू भाषा भारतात तयार झाली. ही समावेशक भाषा असल्याने मी पूर्वोक्त तीन परकी भाषांचा उल्लेख माझ्या सोयीने (आणि अज्ञानामुळे) उर्दू असा करीत आहे.

पहिले पद उर्दू आणि दुसरे पद मराठी असे काही भाषांतर-समास बघा : अर्जीविनंती, बाजारहाट, कागदपत्र, कपडालत्ता, साजशृंगार, दगाफटका, मेवामिठाई, ऐषआराम, चुगलीचहाडी, वजनेमापे, खर्चवेच, हालअपेष्टा. (एकूण १२) या सर्व उदाहरणांत पहिले पद उर्दू आणि दुसरे मराठी आहे. पुढील उदाहरणांमध्ये मात्र हा क्रम उलट झाला आहे. म्हणजेच प्रथम मराठी शब्द असून त्याचा पर्यायी उर्दू शब्द नंतर आहे : भीडमुर्वत, लाजशरम, काटकसर, रीतिरिवाज, धनदौलत, पिवळाजर्द, दिवाबत्ती, निंदानालस्ती, डावपेच, मानमरातब, थट्टामस्करी, चेष्टामस्करी, दंगामस्ती, गडकिल्ला, गोळाबेरीज, पीळपेच, वेळवखत, व्यापारउदीम. (एकूण १८) यानंतर आहेत ते दोन्ही उर्दू शब्द. यांना भाषांतर-समास म्हणणे अशक्य आहे. या जोड्या मूळ भाषेतून आल्या आहेत का ते तज्ज्ञ सांगू शकतील. संस्कृत-संस्कृत, मराठी-मराठी, असे जोडशब्द ज्याअर्थी मराठीत आणि इंग्रजी-इंग्रजी इंग्रजीत रूढ आहेत त्याअर्थी तसे अरबी, फारसी, तुर्की भाषांतही असण्याची शक्यता आहे. हे शब्द असे : नोकरचाकर, बागबगीचा, दवादारू, जोरजबरदस्ती, जुलुमजबरदस्ती, सल्लामसलत, जमीनजुमला, मौजमस्ती, मौजमजा, साफसफाई, कज्जेखटले, कायदाकानून, छानछोक(शानशौकत), अक्कलहुशारी, डागडुजी(दागदोजी), चेहरामोहरा, अरबटचरबट. (एकूण १७)

इंग्रजी राजवट आल्यावर इंग्रजी ही 'परकी' भाषा झाली आणि उर्दू ही 'आपली' भाषा झाली. या वृत्तीचा पुरावा देणारे एकच उदाहरण उपलब्ध झाले. त्यातील दुसरे पद उर्दू आहे. उदाहरण आहे कोर्टकचेरी. नीटनेटके यातील नीट हा शब्द इंग्रजी असावा असे वाटते. जर इंग्रजी संपर्कापूर्वीच्या मराठीत नीट शब्द आढळला तर तो मराठी म्हणता येईल. अन्यथा इंग्रजी-मराठी भाषांतर-समासाचे हे एकच उदाहरण ठरेल.

संस्कृत खरेतर परकी भाषा नाही. पण ती दैनंदिन प्रचारात नसल्याने काही संस्कृत शब्द परके वाटू लागले आणि संस्कृत-मराठी असा भाषांतर-समास आणि त्याबरोबर मराठी-संस्कृत आणि संस्कृत-संस्कृत असे समानार्थी जोडशब्द प्रचारात आले. यांची क्रमाने उदाहरणे अशी- गौडबंगाल, न्यायनिवाडा, लतावेली, उद्योगधंदा, व्यापरउदीम. (एकूण ५) उत्तरपद संस्कृत असलेले शब्द- लाजलज्जा, पांढराशुभ्र, सडासंमार्जन. (एकूण ३) संस्कृत-संस्कृत- पूजाअर्चा, हास्यविनोद, वादविवाद, जनलोक, जीवजंतु, मायाममता, रणसंग्राम, साधुसंत, घोषगर्जना, स्थिरस्थावर, हीनदीन, सदासर्वदा, क्षेमकुशल, व्रतवैकल्य, मानसन्मान, दयामाया, तिथिमिती, धनसंपत्ती, धनवित्त, स्तुतिस्तवन, चलबिचल(विचल), (एकूण २१)

मूळ संस्कृत शब्दांमध्ये थोडा बदल होऊन मराठीत रूढ झालेल्या शब्दांना तद्भवशब्द असे म्हणतात. अशा तद्भव-संस्कृत किंवा उलट क्रमाने रूढ असलेल्या शब्दांच्या जोड्या अशा आहेत. (मूळ संस्कृत शब्द कंसांत दिला आहे.) गप्पागोष्टी (गोष्ठी), मोजमाप (मापन), चालरीत(रीति), काळवेळ(काल, वेला), थोरमोठे(स्थविर), जुनेपुराणे(जीर्ण, पुराण), सर्दीपडसे(छर्दी), भलाचांगला(भद), काळंमेळं(मैल, मलिन), ताळमेळ(मेलन), अक्राळविक्राळ(विकराल), इडापिडा(पीडा), ओढाताण(ऊढ, तान), नासधूस(नाश, ध्वंस), वेळप्रसंग(वेला), कुळीमुळी(कुलं मूलं) धावपळ(धावन्), शिवीगाळ/शिव्यागाळी(गाली) आणि तुकाराम गाथेत मिळालेला शब्द आहे पाशजाळे (पाश, जाल) (एकूण २१).

उदकपाणी हा संस्कृत पूर्वपद असलेला शब्द असला तरी त्याचा रूढार्थ मात्र केर काढून घर साफ करणे असा आहे.

अखेरच्या गटात मराठी-मराठी अशा जोडशब्दांचा समावेश आहे. यांना भाषांतर-समास असे म्हणता येणार नाही. त्यांना जोडशब्दच म्हणावे लागेल. पांढरासफेत, खाटलंबादलं, साधासुधा, उरलंसुरलं, मोडतोड, काटछाट, फाटाफूट, सांडलवंड, वेडाखुळा, वेडापिसा, आपटधोपट, जेवणखाण, विचारपुस, डागदागिने, (दागदागिने, दागडागिने) पैसाअडका, केरवारे, कामकाज, गाडगीमडकी, हाणामारी, मारहाण, मारपीट, मारझोड, मारकूट, मारकुटा, भांडीकुंडी, भांडणतंटा, भांडणतंडण, दगडधोंडे, झाडंपेडं, पाळेंमुळें, थकलाभागला, गवतकाडी, आणभाक, लाकुडफाटा (सरपण या अर्थी), पैजहोड, भाजीपाला, लेकरंबाळं, मुलंबाळं, पोरंबाळं, पोरंलेकरं, गुरेंढोरें, जाळीजळमटें, केरकचरा,

कोनेकोपरे, कानाकोपरा, थंडगार, धागादोरा, पालापाचोळा, गडबडगोंधळ, कामधंदा, काठ्यासोटे, काठीसोटा, झाडलोट, शेकभाज, जाळपोळ, चणेफुटाणे, उघडानागडा, उघडाबोडका, काटेकुटे, जवळपास, लहानसहान, लहानसान, तंटाबखेडा, धाकदपट धाकदपटशा, भोळाभाबडा, नवीनवेली, नवीनव्हाळी, चूकभूल, सुखचैन, गंमतजंमत, भागदौड, धूमधडाका, धरपकड, तोलूनमापून, बीबियाणे, सगेसोयरे, ठावठिकाणा, थांगपत्ता, रुसवाफुगवा, आगळावेगळा, चिराभेगा, गडकोट, गांठभेट, चारचौघे(पुं) चारचौघी(स्त्री), पैपैसा, गल्लीबोळ, रमतगमत, नातीगोती, सोनेंनाणें, काळाकुट्ट, काळाशार, निळेंशार, काळानिळा, जानपेहचान, जानपछान, अचकटविचकट, राजेरजवाडे, आवडनिवड, खाचखळगे, मायमाऊली, कटकारस्थान, नांवलौकिक, सोचविचार, पडझड, ताणतणाव, विल्हेवाट, जडणघडण, बहारवधार, अवंतिउज्जयिनी, तुराकल्गी, गलेलठ्ठ, कावराबावरा/री, शिंदळरांड(११५)

वरील जोडशब्दांपैकी काही शब्द क्रियाविशेषण अव्यये आहेत. उदा. रमतगमत, जवळपास इ. त्यामुळे त्यांत लिंगभेद शक्य आहेत. उदा. चारचौघे/घी/घे, साधासुधा/धी/धे; तर काही विशेषणे असूनही त्यांत लिंगभेद होत नाहीत. उदा. थंडगार वारा(पुं.) हवा(स्त्री.), पाणी(नपुं.), काहींचा उपयोग कर्म म्हणून (बहुतांशी अप्रत्यय द्वितीयेत) तर काहींचा पूरक म्हणून होतो. ती कामकाज आटपून बाहेर पडली (कर्म). ही वार्ता ऐकून तो वेडापिसा झाला (पूरक). दगडधोंडे, पाळेमुळे, लेकरंबाळं, दागदागिने, काटेकुटे, चणेफुटाणे असे काही शब्द नित्य बहुवचनांत वापरले जातात; तर काहींचे आवश्यकतेनुसार एकवचन, बहुवचन होते. उदा. काठीसोटा-काठ्यासोटे; भांडणतंटा-भांडणेंतंटे; गंमतजंमत-गंमतीजमती; भांडंकुडं-भांडीकुंडी, इ. थोडक्यात सांगायचे तर या जोडशब्दांना व्याकरणाचे सर्व नियम लागू आहेत. पैसाअडका, पैपैसा, सोनेनाणे यांचा अर्थ लक्षणा या शब्दशक्तीनुसार थोडी संपत्ती असा होतो. भांडीकुंडी = संसारसाहित्य, गडबडगोंधळ = नियोजनाचा अभाव, सामूहिक बेशिस्त. नांवलौकिक = कीर्ति. यातील नांव याचा मराठीत प्रसिद्धी असा अर्थ होतो. आणि त्याच अर्थाने लौकिक हा शब्द मराठीत वापरला जातो. म्हणून ही समानार्थक जोडी होते. तुरा व कल्गी हे दोन भिन्न शाहिरी पंथ आहेत. पण तुराकल्गी हा शब्द तर्रा कळगे (मल्याळी, कानडी) असा वीरांचे स्मारक असणाऱ्या शिलांचा (वीरगळ) वाचक असून त्यांच्यासमोर होणाऱ्या नृत्यांचा तो वाचक आहे. ध्वनिसाम्याने तो उर्दू मानला गेला असे डॉ. रा. चिं. ढेरे यांचे प्रतिपादन आहे. ('शाहिरीची पूर्वपीठिका - लोकसंस्कृतीची क्षितिजे' पृ. ७७ ते ८१). गलेलठ्ठ या शब्दातील गले हा शब्द प्राकृत गल्ल आहे. राजशेखराच्या 'विद्धशालभंजिका' नाटकात एक वाक्य आहे- गल्ल बईल इव थाने थाने थक्कसि. याची संस्कृत छाया आहे - स्थूलबलीवर्द इव स्थाने स्थाने स्थगसि. यावरून असे दिसते की गल्ल-गल-गले याचा अर्थ लठ्ठ असा





अनुक्रमणिका

होतो. म्हणून गलेगठ्ठ हा समानार्थी जोडशब्द आहे. काळानिळा हा जोडशब्द मानण्याचे कारण काळा आणि निळा हे दोन रंग एकच मानण्याची पद्धत, परंपरा आहे. कृष्ण एकाच वेळी मेघश्याम आणि घननील असतो! कृष्णशार हा हरिणाचा एक प्रकार आहे. तो कदाचित् कृष्णमृग - काळवीट असेल. त्यावरून शार हा शब्द काळा किंवा निळा या अर्थाने प्रचारात आला असल्याची शक्यता वाटल्याने काळाशार, निळाशार हे शब्द दिले आहेत; मात्र यावर मतभेद, शंका निर्माण होऊ शकतात.

वेळप्रसंग हा शब्द कधी कधी वेळीप्रसंगी असा सप्तम्यन्त वापरला जाऊ शकतो. तर मनीमानसी हा नित्य सप्तम्यंत वापरला जातो. अवंतिउज्जयिनी ही विशेषनामांची एकच जोडी मिळाली. एकूण सर्व जोडशब्दांची संख्या १८० होते.

अखेरचा गट जरी मराठी-मराठी म्हटला असला तरी त्यातील सर्वच शब्द मराठी दिसत नाहीत. गडकोट यातील कोट हा शब्द पाली 'कोट्टक', संस्कृत 'कोष्टक'वरून आला आहे. जवळपास, मेवामिठाई, भागदौड, सोचविचार, यांतील पास, मिठाई, भाग, दौड आणि सोच हे हिंदी शब्द आहेत. अन्य भारतीय भाषांमधील विशेषत: कानडी, तमीळ, तेलुगु आणि मल्याळी शब्द जोडशब्दांत असण्याची शक्यता आहे. भाषाभगिनींकडून स्वीकारलेल्या शब्दांचे भाषांतर करण्याची कदाचित् आवश्यकता वाटली नसेल.

दिलेल्या सर्व सामग्रीवरून असे दिसते की जोडशब्दांमधील सर्वच जोडशब्द भाषांतरसमास नाहीत. भाषांतरसमास हे सामाजिक गरज म्हणून निर्माण झाले असण्याची शक्यता आहे; पण ती शक्यता गणिती स्वरूपाची आहे. ती वास्तव असेलच असे निश्चयाने म्हणवत नाही. जर ती गरज असती तर उर्दू मराठी शब्दांचे जसे आणि जितक्या संख्येने भाषांतर झाले तसे इंग्रजी शब्दांचेही व्हायला हरकत नव्हती. प्रत्यक्षात इंग्रजी शब्द मराठी भाषेत भरपूर प्रमाणात आले. तसे पूर्वी उर्दू शब्दही मराठीत भरपूर प्रमाणात वापरले जात होतेच! इंग्रजी कप हा शब्द मराठीत रुजला. त्याच्याऐवजी पेला हा शब्द अनेकांच्या वापरात होता. पण त्यावरून कपपेला असा भाषांतर-समास रूढ झाला नाही. संख्येचा विचार करता भाषांतर-समासांची संख्या कमी(४८) दिसते.

हे शब्द मी अनेक वर्षे गंमत म्हणून जमवत होतो. त्या वेळी मिळतील ते समानार्थी जोडशब्द मिळतील तिथून गोळा केले. या शब्दांचे खोलवर अध्ययन करायला लागल्यावर असे जाणवले की समानार्थी जोडशब्द ही निदान मराठी भाषेची प्रवृत्ती आहे. ती असण्यामागे भाषांतर ही गरज ठरण्याची शक्यता आहे; पण मुळांत ही प्रवृत्ती दिसते. याला प्रत्यंतर देणारे काही रूढ वाक्प्रचार बघा- लेखी लिहून घेणे/देणे/मागणे, 'सह्याद्रीपर्वता'मुळे महाराष्ट्राचे दोन भाग पडतात, 'विदाउट तिकिटाशिवाय' प्रवास केला, 'बिनपाण्याशिवाय' चांगली हजामत केली, 'आजोबांना हल्ली डोळ्यांनी दिसेनासें' झालें

आहे, 'मला कानांनी नीट ऐकूं' येत नाही. इ. येथे जाणता-अजाणता समानार्थी शब्दांचा अनावश्यक वापर केला आहे. मी या प्रकाराला अर्थसंपृक्तीची प्रवृत्ती असे नाव देतो. ■

* उर्दू शब्दांचा आधार
  ( १ ) फार्शी मराठी कोश (संपा.) मा. त्र्यं.-पटवर्धन
  ( २ ) शिवाजीच्या प्रेरणेने झालेला 'राजकोश' (संपा.) अ. द. मराठे

## टागोर आणि सुब्रह्मण्यम्

टागोर ज्याप्रमाणे बंगालबाहेरदेखील प्रसिद्ध आहेत, त्यामानाने भारती हे तामिळनाडूच्या बाहेर खूप कमी लोकांना परिचित आहेत. याला खूप सारी कारणे आहेत; एक तर भारतींना फक्त चाळीस वर्षांचे तर दुसरीकडे टागोरांना ऐंशी वर्षांचे आयुष्य लाभले. दुसरे म्हणजे त्यांची भूमिका प्रखर देशभक्तीची असूनदेखील तामिळनाडूबाहेरील काँग्रेसजनांनी त्यांचा म्हणावा तसा आदर-सत्कार केला नाही. तर याउलट टागोरांची प्रशंसा गांधी-नेहरूंसारख्या नेत्यांनीदेखील केली, त्यामुळे टागोर अधिकच लोकप्रिय झाले. तिसरे कारण म्हणजे, बंगालमधील बुद्धिजीवी हे इतर राज्यांतील बुद्धिजीवींच्या तुलनेत अधिक चांगल्या रीतीने इंग्रजीशी परिचित असतात. त्यामुळेच टागोरांच्या कविता, निबंध आणि त्यांचे झालेले जाहीर वादविवाद, त्याचबरोबर त्यांच्या जीवनाविषयीची माहिती फक्त भारतच नाही तर जगभरातील वाचकांपर्यंत पोहोचवली गेली, ती या बंगालीइतकेच इंग्रजीवर हातखंडा असलेल्या विद्वानांमुळे. याउलट तामिळनाडूमधील विद्वान हे एक तर फक्त त्यांच्या मातृभाषेत लिहितात किंवा फक्त विश्वबंधुत्वाच्या भाषेत म्हणजेच इंग्रजीमध्ये कुशल असतात. असे क्वचितच घडते की या दोन्ही भाषांवर त्यांचे प्रभुत्व आहे.

**- रामचंद्र गुहा, साधना, ७ जुलै २०१८**





अनुक्रमणिका

# चक्क म्हणजे चक्क!

**- शरदिनी मोहिते**

लंडनमध्ये श्रीलंकेविरुद्ध विश्वचषकासाठी खेळताना दीप्ती शर्माने एक सुरेख चौकार मारल्यानंतर कप्तान मिताली राजने लगालगा जाऊन तिचे कौतुक केले... तिची दीप्तीकडे जातानाची उत्सुक लगबग, तिच्या चालण्याचा ढंग, हावभावही केवळ कोणाही स्त्रीमध्येच आढळतील असे होते!... त्यासाठी 'लगालगा'खेरीज दुसरा कोणता शब्दच वापरता येणार नाही... कारण आपल्यासमोर थेट त्या 'चाली'चं 'चित्र' तोच शब्द उभे करू शकतो...

विश्व प्रतिबिंबाचे, बिंब थुरथुर चालत असल्याचे वर्णन श्री ज्ञानदेवांच्या बाळक्रीडा अभंगात आढळते...

चालणं कधी भराभराही होतं, त्यातून घाई, निकड प्रकट होते...

पण तरातराची गंमत दुसऱ्या कशालाच नाही. 'तरातरा' हा शब्द एकप्रकारचा आवेश व्यक्त करतो.

म्हणाल तर हे सगळं चालणंच; पण आता आपण पाहिलेले शब्द त्या त्या विशिष्ट प्रकारच्या चालीचं विशेष वर्णन करतात... त्या विशिष्ट जागी दुसरं कोणतंही विशेषण/क्रियाविशेषण बसूच शकत नाही...

हीच गोष्ट आपल्याला अनेक शब्दात स्पष्ट आढळून येते...

आवाजाची गोष्ट घ्या.

'छुन छुन् छुन बाजे पायल मोरी' ऐकताना पायलचा आवाज अधिकच गोड वाटतो...

भसासा येणाऱ्या वाऱ्याचा आवाज 'भणभणाट' निर्माण करतो.

एकमेकींवर आदळणाऱ्या तलवारींचा आवाज 'खणखणाट' बनून जातो.

पत्र्यावर आवेशात कोसळणाऱ्या गारा तडतडच वाजतात!

'धडाम्'दिशी काहीतरी कोसळते

धाड् धाड् सुसाटणारी आगगाडी सर्वांची आवडती बनून जाते...

धडाम्, धडाधडही आवाज व्यक्त करतात. पण तो प्रकार वेगळा!

'धबाबा तोय आदळे!' रामदास डोळ्यांसमोर साक्षात् प्रपात उभा करतात. तर भाकरी धबाधबा बडवल्या जातात... मात्र सर्वात भारी असते ती काळजाची धडधड!





अनुक्रमणिका

एखाद्या कृतीचे, एखाद्या तत्त्वाचे, घटनांचेही प्रकार असतात. त्यांपैकी काहींचे थोडेफार रूप आपण पाहिले... एखाद्या शब्दाचे आपल्याला माहीत असलेले रूप दाखवणारा अर्थ खराच असतो; पण त्याहून बरोबर उलटाच अर्थ दाखवणारे प्रकारही घडत असलेले आढळतात...

भयंकर खरोखरच भयंकरच असते... पण कधीकधी आपण खूप या अर्थानेही हा शब्द वापरतो. एखादा चित्रपट किंवा एखादी कादंबरी आपल्याला 'भयंकर आवडते!' काही वेळा 'भयंकर सुंदर' हा शब्द ऐकला की, दचकायलाच होते. आणि हाच प्रकार 'भीषण शुंदारे'बद्दलही घडतो...

बंबाळ हे त्या त्या 'प्रकरणा'चे व्यापकत्व दर्शविते; पण एखाद्याचे बोलणे शब्दबंबाळ असू शकते... कधी एखादा कोणी रक्तबंबाळ झालेला असू शकतो!

मूक भाषेतही असा प्रकार आढळतो. दोन्ही हात पसरून उभा असलेला क्रिकेट पंच 'वाईड' दाखवतो. वाईडच! तर कबड्डीचा पंच 'ऑल आऊट' दाखवतो... मात्र तो आविर्भाव पाहून कोणाला शेतातले बुजगावणेदेखील आठवू शकते!

पण, कितीतरी शब्द असे असतात, त्या प्रत्येकाला फक्त एकच एक अर्थ असतो! त्याचे अर्थांतर किंवा भाषांतरही होऊ शकत नाही!... खराखराच अर्थ अगदी खरेपणाने त्या त्या शब्दातच सामावलेला असतो... ऐश्वर्य हे ऐश्वर्यच असते! थक्क म्हणजे थक्कच!... असे आणखी काही शब्द -

| | | | |
|---|---|---|---|
| अख्खा | = अख्खा | अबब | = अबब |
| अरे बाप रे | = अरे बापरे | अरेरे | = अरेरे... |
| आईग! | = आई ग! | खडूस | = खडूस |
| खत्रुड | = खत्रूड | खलास | = खलास, खल्लास |
| खुमखुमी | = खुमखुमी | खुशी | = खुशी |
| ठाम | = ठाम | ठार | = ठार |
| ठो | = ठो! | ठो ठो | = ठो ठो! |
| ढिम्म | = ढिम्म | दैना | = दैना |
| फट् | = फट् | फडशा | = फडशा |
| फडतूस | = फडतूस | फतकल | = फतकल |
| फस्‌कन | = फस्‌कन् | फस्त | = फस्त |
| फन्ना | = फन्ना | फाट | = फाट |
| फैना | = फैना | | |

चक्क म्हणजे चक्कच की!... ■

# गदिमाडॉटकॉम

- श्रद्धा काळेले

महाराष्ट्राला गीतरामायणासारखी दर्जेदार संहिता देणारे ग.दि. माडगूळकर हे श्रेष्ठ कवी, गीतकार, पटकथालेखक, कादंबरीकार अशा विविध स्वरूपात अजूनही मराठी रसिकांच्या मनात वावरतात. त्यांच्याबद्दलच्या माहितीचे आणि त्यांनी लिहिलेल्या निवडक साहित्याचे संकलन करून त्यांच्या नातवाने व नातसुनेने म्हणजे सुमित्र आणि प्राजक्ता माडगूळकर ह्यांनी १९९८ साली ww.gadima.com ह्या संकेतस्थळाची सुरुवात केली. ह्या संकेतस्थळावर गदिमांनी लिहिलेली मराठी गाणी, बालगीते, भक्तिगीते, लावण्या, देशभक्तीपर गीते तसेच चित्रपटगीते आणि गीतरामायण इत्यादींचा समावेश आहे.

ह्या संकेतस्थळावरील २०-२५ वेगवेगळ्या पानांवर गदिमांचे साहित्य उपलब्ध करून देण्यात आले आहे. संकेतस्थळावरील मुख्य पानावर गदिमांची मराठी आणि इंग्रजीतून थोडक्यात माहिती दिली आहे आणि त्याचबरोबर ह्या संकेतस्थळाच्या वेगवेगळ्या पानांवरील थोडा मजकूर मासला म्हणून दिला आहे. ह्याच पानाच्या उजव्या बाजूला गुगलच्या प्लेस्टोअरवर असलेल्या गीतरामायण-ॲपचा दुवा दिलेला आहे. सध्या गीतरामायण ऐकण्याची व वाचण्याची ही सोय फक्त ॲण्ड्रॉईड असलेल्या मोबाईलसाठी उपलब्ध आहे. ह्याच पानावर गदिमांबद्दलची थोरा-मोठ्यांची स्तुतीपर वचनेसुद्धा दिली आहेत. ह्या पानावर डावीकडे 'गदिमांच्या आवाजात' ह्या विभागात खुद्द गदिमांनी म्हटलेल्या कविता वा भाषणे आणि विद्याताई माडगूळकर ह्यांनी गायलेले 'छुमछुम नाच रे मोरा' ह्यांची श्रवण-आवृत्ती ठेवली आहे. त्याचबरोबर गदिमांनी पेशवाईवर 'गंगाकाठी' ह्या नावाने एक काव्यकथा लिहिली होती, तिचे वाचनही यात उपलब्ध आहे. अथर्वशीर्षांचे मराठी रूपांतर ही कल्पनाच भन्नाट आहे, कारण गदिमांच्याआधी असा प्रयत्नदेखील कोणी केला आहे असे ऐकिवात नाही. हे मराठीतील अथर्वशीर्षसुद्धा ह्या संकेतस्थळावर ऐकता येते. त्याचबरोबर गदिमांनी साईबाबांच्या गौरवार्थ लिहिलेली गाणी साई-दरबार ह्या विभागात आहेत. ह्या भागात गदिमा प्रतिष्ठानाविषयीची माहिती आणि तिची उद्दिष्टे दिली आहेत. तसेच येथे गदिमांची वा गदिमांविषयीची काही चलचित्रेही ठेवली आहेत. मुख्य पानावरच प्रतिक्रिया नोंदवण्यासाठीचा दुवा दिला आहे.

'गदिमांविषयी' ह्या सदरातील पानांवर त्यांच्या कारकीर्दीविषयीची थोडक्यात माहिती, त्यांना मिळालेल्या पुरस्कारांची सूची, मराठी वा हिंदी चित्रपटसूची आणि वंशावळ दिली

आहे. 'मराठी गाणी' ह्या विभागात गदिमांनी लिहिलेली मराठी गाणी, बालगीते, भक्तिगीते, लावण्या, देशभक्तीपर गीते तसेच चित्रपट गीते ही एमपी३ स्वरूपात ठेवली आहेत. 'गीतरामायण' ह्या विभागात गीतरामायणाच्या तीन प्रती आहेत, त्यात एक सुधीर फडके यांनी गायलेले मराठी गीतरामायण, आकाशवाणीवरील सुधीर फडके व इतर कलाकारांनी गायलेले मराठी गीतरामायण आणि संस्कृतातील गीतरामायण असे श्राव्य स्वरूपात ठेवलेले आहे. गाण्याच्या प्रत्येक पानावर गाण्याचे बोल, नाव, गायक, संगीतकार व चित्रपट ह्यावरून गाणी शोधण्याची सोयसुद्धा आहे.

श्रीकृष्णचरित्रावर आधारलेल्या 'गीतगोपाल'तील गीतेही येथे 'गीतगोपाल' ह्या पानावर ठेवली आहेत आणि मुख्य म्हणजे सी. रामचंद्र, यशवंत देव आणि श्याम जोशी अशा तीनही संगीतकारांनी वेगवेगळ्या पद्धतीने स्वरबद्ध केलेली गीते येथे ऐकायला मिळतात. 'गदिमांचे साहित्य' ह्या विभागात गदिमांनी रचलेल्या कविता, गीतरामायण, बालगीते, चित्रपटगीते ह्यांचे बोल लिहून ठेवले आहेत. 'आठवणीतून गदिमा' ह्या विभागातील 'गाणी-आठवणी' ह्या पोटविभागात निवडक गाण्यांच्या विशेष आठवणी तसेच 'चित्रपटातील गदिमा', ह्या विभागात चित्रपटनिर्मिती वा त्या चित्रपटाविषयीच्या वेगवेगळ्या आठवणी वाचता येतात. ह्यात गीतरामायणाच्या आठवणींचे वेगळे पान आहे.

'छायाचित्र' ह्या विभागात सुमारे ५०० छायाचित्रे ही 'साहित्यातील गदिमा', 'चित्रपटातील गदिमा', 'राजकारणातील गदिमा' आणि 'कॅलिग्राफीतून गदिमा' अशा विविध विभागांत विभागून ठेवली आहेत. ह्यांत अनेक दुर्मीळ छायाचित्रे आहेत. 'आमच्याबद्दल' या विभागात गदिमांचे कुटुंब अर्थात त्यांचा मुलगा-सून आणि नातू व नातसून ह्यांच्याविषयीची माहिती थोडक्यात दिली आहे.

एकूण हे संकेतस्थळ माहितीच्या दृष्टीने फार-फार समृद्ध आहे. माहितीची मांडणी पुष्कळ नेटकी केली आहे तरी मांडणी सुधारण्याला वाव आहे. विशेष म्हणजे 'आठवणीतून गदिमा' ह्या विभागात सारखीच माहिती दोन पोटविभागांत ठेवलेली आहे. आणि एकूण मजकूरसुद्धा काहीसा तुटक दिसतो. ह्या संकेतस्थळावरील माहितीत काही तुरळक ठिकाणी शुद्धलेखनाच्या चुकासुद्धा आहेत. उदाहरणार्थ- मुख्य पानावर गदिमांच्या माहितीत 'सुद्धा' ऐवजी 'सुध्दा', 'उक्तीनुसार' ऐवजी 'उक्ती नुसार' तसेच 'परिस्थितीमध्ये'ऐवजी 'परिस्थिती मध्ये' इत्यादी. ह्या संकेतस्थळावरील चलचित्रे काही बघता आली नाहीत आणि अडचण काय आहे हेही कळले नाही. वरील काही गोष्टी सोडल्या तर एकंदरीत हा प्रयत्न म्हणजे महाकवीच्या प्रतिभेला वाहिलेली ही अजोड आदरांजली आहे.

■





अनुक्रमणिका

# शिव्या : एक मनोवैज्ञानिक उपचार

- निळू दामले

(मराठी अभ्यास परिषदेच्या स्थापनेनंतरच्या पहिल्या काही वर्षांत 'ग्रंथाली'च्या सहकार्याने मराठी अभ्यास परिषदेने काही चिकटचिठ्ठ्या तयार केल्या होत्या. त्यांतली एक होती : 'शिव्याही द्या; पण मराठीत' शिव्या देण्याची प्रवृत्ती नैसर्गिक आहे. अगदी आदिम काळापासून असावी. या व यासारख्या अन्य 'असभ्य' प्रवृत्ती दडपणे, त्यांच्यावर नियंत्रण ठेवणे हे सभ्यतेचे, सुसंस्कृततेचे लक्षण आहे, असे आपण मानतो. मराठीतील शिव्यांचा कोश तयार करण्याचा एक प्रकल्पही डॉ. केळकरांनी सुरू केला होता आणि त्यासाठी अनेक परिचितांकडून त्यांनी शिव्याही गोळा केल्या होत्या. या पार्श्वभूमीवर निळू दामले यांनी त्यांच्या ब्लॉगमध्ये शिव्यांविषयीच्या दोन इंग्रजी पुस्तकांचा करून दिलेला परिचय वाचनीय व मननीय आहे. पुस्तकांविषयीचे तपशील शेवटी आहेतच. - संपादक)

शिव्यांना, अपशब्दांना भाषेत महत्त्वाचं स्थान आहे. शिव्या किंवा अपशब्द माणसाच्या तीव्र भावनांचं विरेचन करतात. अपशब्द माणसाच्या तोंडून हिरावून घेतले तर भावनांची जागा शस्त्रं घेतात. तेव्हा माणसाच्या निरोगी जगण्यासाठी शिव्या आवश्यक आहेत, असं अभ्यासू संशोधक म्हणतात. बेंजामिन बर्गेन आणि मायकेल एडम्स या लेखकांची नुकतीच प्रसिद्ध झालेली पुस्तकं वरील निष्कर्ष सांगतात.

इकिरो सुझुकी जपानमध्ये बेसबॉल खेळत असे. त्यानं आपल्या खेळाचा विकास करण्यासाठी जपान सोडलं आणि तो अमेरिकेत दाखल झाला. तिथं मैदानात खेळाडूंनी शिव्यांचा सढळ वापर केलेला ऐकून सुरुवातीला तो अवाक् झाला होता. नंतर तो अपशब्दांना सरावला. खेळात थराराच्या सीमेवर पोचल्यावर त्याच्या तोंडूनही अपशब्द निघू लागले. मनासारखा खेळ झाला की अपशब्द, जमलं नाही की अपशब्द, आनंद झाला की अपशब्द. दु:ख झालं की अपशब्द, राग आला की अपशब्द. लवकरच सुझुकी आंतरराष्ट्रीय दर्जाचा खेळाडू झाला.

सुझुकी सांगतो की जपानी भाषेमध्ये अपशब्द जवळजवळ नाहीतच. एखाद्या व्यक्तीनं काम योग्य रीतीनं केलं नाही तर त्याचा बॉस त्याला सांगतो, 'माणसा, तुझं काम तू योग्य रीतीनं करायला हवं होतंस. तसं केलं असतंस तर उत्पादन वाढलं





अनुक्रमणिका

असतं, फायदा झाला असता.' हे सारं अमेरिकेत एका शिवीत, दोन अपशब्दांत अधिक प्रभावी पद्धतीनं मांडता येतं. समोरचा जे समजायचं ते समजून घेतो.

शिव्या बहुतांशी लिंग, योनी यांच्याभोवती असतात. संभोग हा शिव्यांचा गाभा असतो. आईशी संभोग, प्राण्याशी संभोग, जगातल्या कुठल्याही आपल्याला न आवडणाऱ्या वस्तूंशी संभोग, बहिणीशी संभोग या गोष्टी शिव्यांतले शब्द सांगतात. लेखक म्हणतात की शिवी देत असताना त्या शब्दांचे शब्दकोशातील अर्थ माणसाच्या मनात नसतात. राग व्यक्त करण्यासाठी त्यानं ती शब्दयोजना केलेली असते. बोलणाऱ्या माणसाच्या भावना महत्त्वाच्या असतात, शब्द नव्हे.

शिव्यांचा उच्चार, वापरलेली आवाजाची पट्टी, हावभाव इत्यादी गोष्टींवरून माणसाच्या भावनांची तीव्रता लक्षात येते. अगदी हळुवारपणे, पाठीवर हात ठेवत कोणी शिव्या देत नाही. अंगाई गीत किंवा भैरवी गायल्याप्रमाणं कोणी शिवी उच्चारत नाही. शिव्या देताना हातांचे हावभाव सुद्धा उत्तेजक असतात. हाताची घडी घालून किंवा नमस्कार करून कोणी शिव्या देत नाही.

माणसाच्या दैनंदिन जीवनात असे प्रसंग येतात जेव्हा माणसाला तीव्रतेनं व्यक्त व्हायचं असतं. आपली लायकी असतानाही दुसऱ्या माणसाला वशिल्यामुळं बक्षीस वा नोकरी मिळाली की माणसाला भयंकर राग येतो. तासन् तास एटीएमच्या रांगेत उभं राहूनही पैसे मिळत नाहीत तेव्हा संतापाचा कळस होतो. रोग्याला तत्काळ उपचाराची गरज असताना हॉस्पिटलमधले लोक त्याच्याकडं दुर्लक्ष करतात किंवा कागदं भरायला लावतात तेव्हा कळस होतो. आपल्याला परीक्षेत अव्वल यश मिळतं तेव्हा आनंदाचा धक्का बसतो. आनंदाचा धक्का बसतो तेव्हा कदाचित माणसाची आईची किंवा देवाची आठवण काढत असतील; पण त्रास होतो तेव्हा खचितच सणसणीत शिवी तोंडून बाहेर पडते. ती शिवी माणसाचा रक्तदाब स्थिरावायला मदत करते.

अनेक वेळा अनुभव असा येतो, की शिवराळ माणसं मोकळीढाकळी असतात, स्वच्छ असतात, कारण त्यांना लपवाछपवी आवडत नाही. अगदी शांतपणे आणि सभ्यपणे बोलणारी माणसं लबाड असतात, आतल्या गाठीची असतात, स्वच्छ व्यवहार करत नाहीत, असाही अनुभव अनेक वेळा येतो. शिव्यांचा सढळ वापर करणं किंवा वापर न करणं हा बऱ्याच वेळा माणसाच्या व्यक्तिमत्त्वाचा एक भाग असतो.

फक् या शब्दाची, शिवीची, सविस्तर चर्चा लेखकांनी त्यांच्या पुस्तकात केली आहे. फक् या शब्दाचे फ्रेंच, जर्मन, लॅटिन भाषेतले उगम लेखकांनी दाखवले आहेत. १२७८ साली एका कोर्टदरबारी नोंदीमध्ये एका माणसाचा जॉन ले फकर असा उल्लेख आढळतो. ख्रिस्ती धर्मामध्ये सेक्स ही गोष्ट पाप मानली गेली असल्यानं फक् या शब्दाचा वापर अशिष्ट मानला जात असे. सार्वजनिक ठिकाणी, साहित्यात तो शब्द वापरणं

समाजाला मान्य नव्हतं. व्यवहारात अर्थातच फक् हा शब्द नाम, क्रियापद इत्यादी पद्धतीनं सर्रास वापरला जात असे; पण त्याची दखल घेतली जात नसे. १७७५ सालच्या इंग्रजी शब्दकोशात त्या शब्दाची 'संभोग या शब्दाचं ते गावंढळ, नीच रूप आहे,' अशी नोंद केली गेली. १७९० नंतर इंग्रजी साहित्यात हा शब्द उमटू लागला. एका कवीनं एका बापाचं मन व्यक्त करताना हा शब्द वापरला. मुलगा पुस्तकी किडा झाल्यानं बाप चिडला होता. बाप म्हणाला, फक् युवर रिडिंग. कवितेनं खळबळ माजवली होती. १९६५ मध्ये फक् हा शब्द इंग्रजी शब्दकोशात (जॉन एशलीच्या) अवतरला.

अमेरिका आणि ब्रिटनमधल्या इंग्रजी भाषेवर, संस्कृतीवर, व्हिक्टोरियन संस्कृतीचा प्रभाव असल्यानं वर्तमानपत्रं, भाषणं, माध्यमं यामध्ये फक् या शब्दला वाव नव्हता.

पहिल्या आणि दुसऱ्या महायुद्धानंतर इंग्रजी समाजाचं रूप बदललं. युद्ध हा या समाजाचा एक महत्त्वाचा आणि मोठ्ठा भाग झाला. लाखो सैनिक निर्माण झाले. सैनिक जिवाच्या आकांतानं लढत असतात. ते जेव्हा गोळीबार करतात, शत्रूसैनिकांना संगिनीनं भोसकण्यासाठी सरसावतात, त्या वेळी शिव्यांचा पाऊस पडत असतो. सैनिकी जीवनात, क्षणाक्षणाला शिव्यांचा वापर होत असतो. युद्ध, सैनिक इत्यादी विषय साहित्य, सिनेमा, पत्रकारी यात यायला लागले आणि त्यामुळं फक्, शिट्, होली शिट् इत्यादी शब्द अटळ होते. दैनिकं, साप्ताहिकं, कादंबऱ्या यातून वरील शब्द यायला लागले. प्रथम संपादकांनी विरोध केला. पण शिव्यांचा वापर केला नाही तर सैनिक, पोलीस, गुन्हेगार, जाझ संगितकार, मुष्टियोद्धे, फुटबॉलपटू इत्यादी चित्रण अशक्यच होतं. मार्लन ब्रँडोचा 'अपोकॅलिप्स नाऊ' हा चित्रपट प्रसिद्ध झाला आणि माध्यमांनी आजपर्यंत नकार दिलेले शब्द वापरायला सुरुवात केली. सायगॉव शिट् असं या सिनेमाचं वर्णन करावं लागलं; कारण एकूण व्हिएतनाममधील अमेरिकेची कारवाई शिट् या सदरातच मोडणारी होती.

साप्ताहिक 'न्यू यॉर्कर' हा व्हिक्टोरियन संस्कृतीचा एक मजबूत खांब होता. रॉस आणि शॉन हे दोन्ही संपादक फक्, शिट् इत्यादी शब्द 'न्यू यॉर्कर' साप्ताहिकात फिरकू देत नसत. शब्द सौम्य करून वापरण्यावर त्यांचा कटाक्ष होता. एका पत्रकारानं स्वप्न या विषयावर वैज्ञानिक लेख लिहिला होता. मांजरांना नीट झोप लागली नाही की ती संभोग करतात असा वैज्ञानिक निष्कर्ष होता. पत्रकारानं शब्द वापरला होता की मांजरं माउंट करतात. शॉन माऊंट या शब्दाला आक्षेप घेत होते. त्यांनी सुचवलं की नर मांजर मादी मांजराला सेक्सचा कल सुचवतं अशा अर्थाचे शब्द वापरा. पत्रकार हसला. तो म्हणाला की मांजरं कधी अशा भाषा वापरत नाहीत. वाद झाला. शेवटी शॉन यांना पत्रकाराचं म्हणणं पटलं. समाजामध्ये जे प्रस्थापित आहे ते बदलण्याला, त्यात पाणी-तुळशीपत्र घालून ते शुद्ध करण्याला अर्थ नाही हे त्यांनी मान्य केलं, माऊंट हा शब्द त्यांनी मान्य केला. फक्, शिट्, इत्यादी शब्द 'न्यू यॉर्कर'मध्ये जिथं आवश्यक वाटले

तिथं यायला लागले. एका पत्रकारानं तर विक्रमच केला, त्याच्या लेखात फक् हा शब्द सतरा वेळा आला होता आणि न्यू यॉर्करनं तो छापला.

आता राष्ट्रपती, खासदार, मुत्सद्दी इत्यादी लोक सढळपणे फक् हा शब्द वापरतात. त्या शब्दाला असलेला संभोग किंवा शारीरिक संबंध हा अर्थ जवळजवळ नाहीसा झालाय. खड्ड्यात गेली तुमची पार्टी, खड्ड्यात गेला तुमचा प्रस्ताव, खड्ड्यात जाओत तुमचे विचार असं आपण म्हणतो, अमेरिकेत त्यातल्या खड्डा या गोष्टीला सर्रास फक् असा शब्द वापरतात.

२०१४ साली पोपनी धमाल केली. पोप फ्रान्सिस व्हॅटिकनमध्ये भाषण करतांना इन धिस केस (इन क्युस्टो कासो) असं म्हणायचं असताना चुकून इन क्युस्टो काझो असं म्हणाले. 'काझो' या शब्दाचा अर्थ फक् असा होता. 'केस'ऐवजी 'क़ाझो' अशी चूक अनवधानानं घडली. पोपच्या नंतर ते लक्षात आलं, त्यांनी चूक कबूल करून माफीही मागितली. पण ऐकणाऱ्या लोकांची तारांबळ उडाली आणि काही मंडळी जाम हसली.

अलीकडं भाजपचे दानवे वैतागून लोकांना 'साले' असं म्हणाले. ते शेतकऱ्यांना साले म्हणाले की विरोधकांना ते स्पष्ट नाही. परंतु साले हा शब्द वापरण्यावरून ओरड झाली. साले याचा खरा अर्थ मेव्हणा असा आहे. मेव्हणे छळतात, अशा अर्थानं त्रास देणाऱ्या माणसाला 'साला' म्हणतात. हा शब्द सर्रास वापरला जातो. साले असं म्हणताना विरोधकांनी जेरीस आणल्यानं वैतागलेल्या दानवेंनी 'साले' हा शब्द वापरला. त्यांचा वैताग हा त्यातला लक्षात घेण्याचा भाग. त्या आधी एकदा राष्ट्रवादीचे अजित पवार बोलताना 'मग मी मुतू काय' असं म्हणाले होते. यात खरोखर मुतण्याचा प्रश्न नव्हता, त्यांना आलेला वैताग त्यातून व्यक्त होत होता.

शिव्या, अपशब्दाचा वापर हा एक मनोवैज्ञानिक उपचार आहे, असं विचारवंतांचं मत आहे.

■

# मोडू नका वचनास, नाथाऽऽ

- सुचेता परांजपे

[ आपण बोलतो तेव्हा भाषेत काय काय गमती चालू असतात, ते काही वेळा लक्षात येत नाहीत; पण जर भाषेतली गंमत बघायची दृष्टी असेल, तर वेगळेच प्रश्न समोर यायला लागतात.]

खरेतर, दिले वचन मोडू नये म्हणतात; पण शाळेत जाऊन जेमतेम दोन-चार वर्षे होतायत् ना होतायत्, तोच मराठीच्या पेपरात 'वचन बदला' असा प्रश्न यायला लागतो. (आपण सगळ्यांनीच, कमी-अधिक चुका करत, ही उत्तरे खरडलेली असतातच) पण आता मोठे झाल्यावर, मुख्य म्हणजे भाषेतली गंमत बघायची दृष्टी आल्यावर वेगळेच प्रश्न समोर यायला लागले, उदाहरणार्थ, बाई आणि बायको या दोन्ही शब्दांचे अनेकवचन 'बायका' असेच कसे काय होते? काही वेळेला बाई-बाया असेही अनेकवचन दिसते, नाही असे नाही : जसे, 'बुवा तेथे बाया'. पण प्रमाण मराठीत 'बाई'चे अनेकवचन 'बायका' असेच दिसते. म्हणजे, व्याकरणकारांच्या मते बाई आणि बायको, म्हणजे स्त्री आणि पत्नी या एकच आहेत का? कोणतीही बाई बायको असू शकते, असे सुचवायचेय का त्यांना? एकूण या 'बायका' शब्दामागे व्याकरणापलीकडचा काहीतरी सामाजिक आशयही दडलाय की काय?

आणखी एक शब्द मला नेहमी गोंधळात टाकतो. मुलगी याचे अनेकवचन मुली असे होते. मराठीत याला समांतर उदाहरण पाहण्यात नाही. कलगीचे कलग्या, कणगीचे कणग्या अशी रूपे येतात. मग 'मुलगी'लाच हे स्वतंत्र रूप की निमित्त? आणखी एक गंमत म्हणजे 'मुलगी'चे सामान्यरूपही 'मुली'च आहे. तुम्ही कणगीत, कलगीला, वगैरे म्हणू शकता. पण 'मी माझ्या मुलगीला म्हटले', असे आपण म्हणत नाही. 'मी माझ्या मुलीला म्हटले', असेच म्हणावे लागते. एकूणच, 'मुली'ला व्याकरणात एक खास स्थान दिलेले दिसते.

सध्या, भाषा सोप्पी हवी, हा सगळ्याच भाषाविषयक नेमनियमांचा मूलमंत्र झालाय. शिवाय, नियम पाळलेच पाहिजेत, हेही बंधनकारक नाहीये. वेरूळमधल्या मूर्त्या छान आहेत ना? यातला 'मूर्ती' या योग्य अनेकवचनी शब्दाऐवजी येणारा 'मूर्त्या' हा शब्द कानाला बोचेनासा झालाय. अस्सल मऱ्हाटी लोकांची ही तऱ्हा. मग इंग्रजी माध्यमात

शिकणाऱ्यांबद्दल काय बोलावे? मध्यंतरी एका मित्राकडे गेले होते. तो त्याच्या धाकट्या मुलाला 'शुभं करोति' म्हणून नंतरच टीव्ही बघायच्या, हे पटवण्याच्या खटपटीत होता; पण चिरंजीव सवाई निघाले. त्याने चटकन सांगून टाकले, 'बाबा, तेवढा छोटा भीम बघू दे ना मला. मग मी सगळे श्लोक्स म्हणीन!' मी दचकलेच. 'श्लोक्स'! म्हणजे आता संस्कृतनेही इंग्रजी भ्रतार केलाय की काय?

मध्यंतरी मी एका ब्रिटिश माणसाला, आपण त्याला हॅरी म्हणू या, मराठी शिकवत होते. लिपी अजिबात न शिकताही फाड्फाड् मराठी बोलणारा हॅरी मराठी शिकणे चक्क एन्जॉय करायचा. खेळ खेळल्यासारखे चालायचे आमचे शिकणे - शिकवणे. जसे 'अनेकवचनी रूपे अशी असतात' ऐवजी 'हॅरी, एक रस्ता. चार?' असे मी विचारले की त्यांनी 'रस्ते' म्हणायचे. 'एक खुर्ची - चार?' 'खुर्च्या', असे आमचे सारखे चालायचे. एकदा मी शिकवणीला गेले तर आणखी तीन-चार जण बसलेले होते. हॅरीने ओळख करून दिली! 'ह्या सुचते, माझ्या मराठी शिक्षिका आणि सुचेता, हे माझे मित्रच.' मी हसून नमस्कार केला आणि ते 'मित्रच' बाहेर पडल्याक्षणी म्हटले, 'अरे बाबा, मित्रच म्हणजे काय? नुसते मित्र म्हणायचे'. हॅरी हुशार होता. त्याने लगेच आपल्या वहीतली नोंद दाखवली. कधीतरी त्याने विचारले होते, 'सुचेता, एक: मित्र-चार?' आणि मी क्षणाचाही विलंब न लावता म्हटले होते, 'एक मित्र आणि चार मित्रच.' म्हणजे चूक माझीच!

या 'वचन बदला' प्रकरणाचा खरा कहर माझ्या भाचीच्या लग्नाच्या वेळी झाला. भाचीने मला सीमांतपूजनाच्या वेळीच सांगून ठेवले, ''मावशी, उद्या सकाळी मी नऊवारी नेसणारेय. त्या वेळी मला मोत्याच्या कुड्या आणि ठूस लागेल हं.'' मी जरा गडबडलेच. हे 'ठूस' प्रकरण?. तिला मी विचारले तसे तिने डबीतून 'ठुशी' काढून मला दाखवली, वर म्हणाली, ''याला ठूस म्हणतात बरं का मावशीबाई!''

अगं बाई ठूस नाई, ठुशी म्हणतात याला. माझ्या या असफल स्पष्टीकरणानंतर तिने खूपच करुणेने माझ्याकडे पाहिले आणि म्हणाली, 'अय्या, तू भाषा ना शिकवतेस? एवढे कसे माहीत नाही तुला? अग, एक असेल तर ठूस आणि तीन-चार असल्या तर ठुशी, समजलं? ठूसचे अनेकवचन ठुशी. म्हणजे बघ... अं... हां! एक घूस, चार? घुशी. हो की नाही? तसेच ठूसचे असते. समजलं.'

नवऱ्या मुलीला लग्नाच्या आदल्या दिवशी व्याकरणाचे धडे देण्याइतकी काही ही मावशी यडपड नव्हती; पण दुसरे दिवशी बोहल्यावर मंगलाष्टकाचे सूर घुमत असताना माझ्या काना-मनात मात्र एक घूस आणि दोन? दोन घुशी! हेच शब्द घुमत होते. कसे काय त्या शालेय वयात 'वचन बदला' या प्रश्नाला मल पैकीच्या पैकी गुण मिळायचे, देव जाणे! ■





अनुक्रमणिका

# मन्वतराचा मागोवा

- माधुरी दाणी

[ परीक्षित पुस्तक : सायबरसंस्कृती : रमेश नारायण बरखेडे, प्रकाशक : इन्स्टिट्यूट ऑफ नॉलेज इंजिनियरिंग, नाशिक, पृष्ठे ३४४, मूल्य रुपये ३५०/-]

रमेश बरखेडे हे नाव मनात ठसले होते ते 'साहित्य विमर्श' या पुस्तकामुळे. याशिवाय ते 'अनुष्टुभ'चे संपादक, धुळ्याच्या 'मराठी प्रगत अध्ययन संस्थे'चे ते संस्थापक-संचालक, यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठाच्या मानव्यविद्या व सामाजिक शास्त्रे विद्या शाखेचे संचालक ही त्यांची ओळख होती. विविध प्रकारची पाठ्यपुस्तके व अध्ययन साहित्याची निर्मिती करणारे शिक्षणतज्ज्ञ म्हणून ते परिचित होते. त्यांनी विपुल लेखन केले आहे आणि बडोद्याच्या महाराजा सयाजीराव गायकवाड यांच्या भाषणांचे पाच खंड विस्तृत प्रस्तावनेसह संपादित केले आहेत याची जाणीव होती, पण जेव्हा 'सायबर-संस्कृती'सारख्या पुस्तकावर लेखक म्हणून रमेश बरखेडे यांची नाममुद्रा पाहिली तेव्हा आश्चर्य वाटल्यावाचून राहिले नाही. एका अतिशय वेगळ्या अभ्यासक्षेत्रात त्यांनी सखोल काम केले आणि तेही निवृत्तीनंतर, हेही महत्त्वाचे आहे. त्यांचे गुरूवर्य म. सु. पाटील यांनी 'सेवानिवृत्तीनंतर आळसात वेळ घालवू नको, नवे काहीतरी करत राहा' असा इशारा दिल्याने आपण हे काम केले असे लेखक सांगतात.

आपण आज सायबर तंत्रज्ञान वापरतोच; पण या विश्वाची तंत्रवैज्ञानिक ओळख करून न घेता, संकल्पना समजावून न घेता हे तंत्रज्ञान वापरतो. ही ओळख करून घेण्यासाठी मराठीत अशा पुस्तकांची गरज आहेच.

विशेषत: गेल्या तीस वर्षात आपल्या सर्व प्रकारच्या जीवनव्यवहारांवर सायबरचा परिणाम झाला आहे. हे एक 'आभासी जग' (व्हर्च्युअल वर्ल्ड) आहे. या आभासी जगामुळे आपल्या जीवनात किती प्रकारचे बदल झाले हे सांगत या नव्या बदलांमुळेच आजची संस्कृती ही 'सायबर संस्कृती' म्हणून ओळखली जाऊ लागली आहे. या मन्वंतराचा मागोवा घेण्यासाठी आपण हे पुस्तक लिहिले असे लेखक सुरुवातीलाच सांगतात. या पुस्तकात चार प्रकरणे आहेत. 'सायबर परिभाषा' हे पाचवे प्रकरण आहे.

'सायबर विश्वाची उत्क्रांती' या पहिल्याच प्रकरणात लेखक सायबर संस्कृतीच्या वाटचालीमुळे आपल्या जीवनात किती बदल घडून आले ते सांगतात. १९७० साली मायक्रोप्रोसेसर्स आले आणि तंत्रज्ञान क्षेत्रात नवे मन्वंतर घडून आले. नेटवर्कच्या विस्ताराने

जीवनातील बहुतेक सर्व क्षेत्रांवर नेटवर्कची सत्ता चालू लागली, असे सांगून लेखक इंटरनेटच्या वाटचालीचा सविस्तर आढावा घेतात. आज वेबपेज, सायबर स्पेस, सोशल नेटवर्क, इबे, विकिपीडिया, मायस्पेस, फ्लिकर, फेसबुक, यू ट्यूब, ट्विटर, शेल्फारी, टम्बलर, व्हॉट्स-ॲप या संकल्पना अतिशय लोकप्रिय झाल्या आहेत. या सर्वांचा वापरही आपण करतो. या सगळ्यांची विस्तृत माहिती देऊन लेखक याविषयी असलेल्या समजुती व भ्रम यांचाही परामर्श घेतात.

इंटरनेट संशोधन हे युद्धशास्त्रासाठी करण्यात आले. युद्धतंत्रज्ञानाच्या गरजेतून संगणकीय तंत्रविद्या विकसित झाली. नंतर संगणकीय संशोधनाचा कल व्यापार-क्षेत्राच्या बाजूने झुकू लागला. शेअर बाजारातील खरेदीविक्री सायबर विश्वामुळे 'तरंगती' झाली. जी वस्तू प्रत्यक्षात विकणे शक्य नाही तिची तरंगती विक्री सुरू झाली, असे सांगत 'आभासी वास्तवाच्या स्वरूपातील आर्थिक सामाजिक जीवनव्यवहारांचा पैस म्हणजे 'सायबर स्पेस' अशी सोपी व्याख्याही लेखक करतात.

'नेटवर्क समाज' या दुसऱ्या प्रकरणात नेटवर्क समाजाची चर्चा करत असताना लेखक 'समाज' या संकल्पनेवर नेटके भाष्य करतात. समाजातील विषमता स्पष्ट करत 'डिजिटल विषमते'ची संकल्पना मांडतात. जे नेटवर्कपासून दूर राहिले ते आपापल्या स्थानीच राहिले आणि सामान्यजन ठरले. उलट जे नेटवर्कच्या संपर्कात राहिले ते अभिजन बनले. यामुळे संस्कृती विग्रह झाला, असे स्पष्ट करतात.

नेटवर्क-समाजाची त्रिदलीय रचना अगदी सोप्या भाषेत लेखक मांडतात. डिजिटल विषमतेचा केवळ प्रश्न ते मांडत नाहीत तर ही विषमता कशी दूर करावी तेही सांगतात. 'व्यक्ती'ला केंद्रस्थानी न ठेवता 'व्यक्तिसमूह' केंद्रस्थानी ठेवून विचार करायला हवा, डिजिटल माध्यमांचे सामाजिकीकरण करायला हवे, डिजिटल शिक्षण सर्वांना मिळायला हवे, सार्वजनिक पातळीवर डिजिटलसेवा उपलब्ध व्हाव्यात, डिजिटल साक्षरता वाढावी असे उपायही सांगतात. नेटवर्कक्षेत्राचा सामाजिक, आर्थिक, राजकीय, शैक्षणिक, तांत्रिक आढावा ते घेतात. सोशल नेटवर्कच्या माध्यमातून एकटेपणा घालवण्याचा मंत्र लोकांना प्राप्त झाला आहे, इंटरनेटच्या माध्यमातून संवादाची पर्यायी जागा लोक शोधत आहेत असे ते सांगतात. पण यामुळे मुले पालकांपासून दुरावल्याची खंत व्यक्त करतात. डिजिटल माहितीस्रोतामुळे बाजारपेठेतील पारदर्शकता वाढली, वेबच्या खुल्या आदर्शवादामुळे पूर्ण स्पर्धा आली असे म्हणत राजकीय जाणीवजागृतीसाठी नेटवर्कचा केवढातरी सकारात्मक वापर होऊ लागला आहे असे म्हणतात. याची भरपूर उदाहरणेही लेखकाने दिली आहेत. शैक्षणिक आंतरजालाविषयी माहितीत जगप्रसिद्ध 'सलमान खान अकादेमी'बद्दलही लेखक लिहितात. खुल्या देवघेवीच्या संस्कृतीचा उल्लेख करतात. त्याच वेळी वाढत चाललेल्या विघातक प्रवृत्तींविषयी चिंताही व्यक्त करतात.

संवेद्य संदेशवहन आंतरजाल (सेन्सर नेटवर्क), ड्रोनचा वापर कसा अर्थपूर्ण ठरणार आहे, या नवतंत्रज्ञानातून नेटवर्क संस्कृती कशी विकास पावत आहे हे सांगतात.

'सायबर संस्कृती' हे तिसरे प्रकरण विशेष महत्त्वाचे वाटते. सायबरविश्वाच्या उत्क्रांतीबरोबरच 'सायबरसंस्कृती' आकार घेऊ लागली, असे सांगत लेखक 'संस्कृती'वर अभ्यासपूर्ण भाष्य करतात. भारतीय दर्शनशास्त्रातील 'पतत्र' या संकल्पनेशी सायबरचे साम्य आहे हे स्पष्ट करतात.

जगातील बहुसंख्य महिला गरीब आणि अशिक्षित असून या आभासी जगापासून दूर आहेत. त्यांच्याकडे आवश्यक संसाधने नाहीत, इंग्रजीचे ज्ञान नाही. तरीही वेब माध्यमाचा महिला कसा सकारात्मक वापर करीत आहेत, याची उदाहरणे लेखक देतात. 'भविष्यकालात समाजाचे चालकत्व माणसापेक्षा यंत्राकडेच राहील' ही इ.एम.फॉस्टरची भविष्यवाणी खरी ठरत आहेच; पण उपभोगवादी ग्राहककेंद्री समाज निर्माण होत आहे असे ते सांगतात. मानवी मूल्यांचा ऱ्हास होत असल्याची खंत व्यक्त करतात. विविध देशातील शासनसत्ता संपर्कजालावर कसे नियंत्रण ठेवतात याचे विवेचन करतात.

सायबर गुन्हेगारी हा विषय सर्वसामान्य संगणक वापरकर्त्यांच्या विचारापलीकडचा आहे. लेखक हॅकर्सच्या पिढ्यांची माहिती देत सायबर गुन्हेगारीची तीन परिमाणे सांगत हॅकर्स-क्रॅकर्ससमधील भेद स्पष्ट करतात. सभ्य हॅकर्स आणि बदमाश क्रॅकर्सची माहिती वाचून मोठीच गंमत वाटते. सायबरविश्व हे अमेरिकेने 'पाचवे लष्करी क्षेत्र' म्हणून जाहीर केले, यासाठी नवे कॅबिनेट सचिवाचे पद निर्माण केले ही माहिती थक्क करते.

'कमीत कमी साधने आणि मोठी नासधूस' ही सायबर दहशतवादाची व्याख्या देऊन लेखक २००८च्या मुंबईवरच्या दहशतवादी हल्ल्याची या दृष्टिकोनातून चिकित्सा करतात. तरुण मोठ्या संख्येने दहशतवादी संघटनांच्या आहारी का जातात याची मीमांसा करतात. उद्याचे 'सायबर जिहादी' कसे तयार होतील, हे सांगणारे अवतरण देतात. या सगळ्याचा मुकाबला संगणकीय यंत्रणा कशी करते तेही स्पष्ट करतात.

'इंटरनेट हे जितके माहितीस्रोत पुरविणारे साधन आहे तितकेच खोटी माहिती पुरवून दिशाभूल करणारे माध्यम आहे' हे लेखकाचे विधान पुरेसे बोलके आहे. ऑनलाइन जाहिराती ग्राहकाची खरेदीलालसा जागवत आणि उपभोगाची वृत्ती वाढवत जाहिरातींच्या तालावर चालणारा समाज घडवत आहेत असा इशारा लेखक देतात.

'सायबोर्ग म्हणजे जैविक आणि तंत्रज्ञानात्मक जोडणीतून निर्माण झालेला रचनाबंध' ही संकल्पना ते स्पष्ट करतात. भविष्यात माणूस व यंत्र एकमेकात विलीन होतील, सायबोर्ग बनतील व अनंतकाळ जगतील असा प्रा. हरारी यांचा अंदाज मांडून यामुळे काय काय घडू शकेल याविषयीची काही अभ्यासकांची मते लेखक उद्धृत करतात.

जशी भाषा असते तशीच जीवनशैलीही असते. सायबर संस्कृतीने स्वत:ची वेगळी

सायबर बोली रूढ केली आहे. यासाठी नवे टवटवीत शब्द घडविले आहेत. जसे माउस, कॅट, ट्विट, हॅक, बग, ब्लू टूथ, गूगल इत्यादी. या शब्दांची पार्श्वभूमी लेखकाने मोठ्याच लालित्यपूर्ण शब्दांत व्यक्त केली आहे.

'वाचेशिवाय भाषा' हे सायबर बोलीचे वैशिष्ट्य आहे असे सांगत 'सुखद(:)', दु:खद(:)' अशा चित्रमय प्रतिकांची भाषा कशी विकसित झाली हे स्पष्ट करतात.

इंटरनेट युगात प्रज्ञावानांपेक्षा दलालांचीच सत्ता चालते म्हणून सामान्य दर्जाच्या निर्मितीला बाजारपेठ मिळाली असे मत लेखक मांडतो. 'निसर्ग आणि नेटवर्क या दोन्हींचा साधक वापर करणारी संकरित जीवनदृष्टी घडविणे ही काळाची गरज आहे' याचे भान लेखक देऊ बघतात.

'सैद्धांतिक विमर्श' या चौथ्या प्रकरणात लेखक सायबर संस्कृतीच्या अभ्यासाचे तीन टप्पे मांडतात.

अतिशय महत्त्वाची अशी ''उत्तर मानवाची'' संकल्पना लेखक स्पष्ट करतात. 'सेंद्रिय शरीराचे सायबर शरीरात रूपांतर करणे' ही उत्तर मानवाची संकल्पना आहे. हा नवा उत्तर मानव कसा असेल, या अत्याधुनिक तंत्रज्ञानामुळे काय काय घडू शकेल हे लेखक सांगतात. हे सगळे इतके रंजक आहे की ते मुळातूनच वाचायला हवे.

'नव्या मन्वंतरामुळे 'इथे' हे परिमाण संपून केवळ 'आत्ता' एवढेच परिमाण उरले आहे, हे पॉल व्हिरिलो यांचे मत, 'सायबर समाज हा स्वयंनिवडीवर अधिष्ठित असतो, प्रसंगोपात्त आणि क्षणभंगूर असतो हे रॉबिन्स यांचे मत मांडून त्याचे विवेचन लेखक करतात.

सार्वजनिक संपत्ती, सायबर स्वातंत्र्यवाद, सायबर नैतिकता, नेटनिरपेक्षता, सायबर अस्मिता अशा विविध संकल्पना लेखक स्पष्ट करतात. आज स्त्री-जीवनाचा पैस डिजिटल माध्यमांनी व्यापला आहे. या डिजिटल तंत्रज्ञानाचा स्त्रीजीवनावर काय परिणाम होतो ते सायबर स्त्रीवाद तपासतो आहे. लेखकाने 'सायबर स्त्रीवाद' आणि 'पोटसंस्कृती' या नवीनतम संकल्पना विस्ताराने मांडल्या आहेत.

प्रत्येक छोट्या-छोट्या बदलानेही भाषा संस्कारित होत असते. जगातील सर्व देशात, सर्व वयोगटात आर्थिक प्रादेशिक स्तरात सायबर-माध्यमांनी प्रवेश केला आहे. म्हणून मराठी भाषेलाही नवा तोंडवळा मिळू पाहात आहे. सायबर-भाषेलाही स्वत:चे सौंदर्यमूल्य प्राप्त होत आहे. अशा वातावरणात लेखक नव्या शब्दांची संकल्पनात्मक घडण पाचव्या 'सायबर परिभाषा' या प्रकरणात स्पष्ट करतात. इंग्रजीतील सायबर परिभाषेला पर्यायी मराठी प्रतिशब्द घडविताना अर्थभेद किंवा भाषिक संभ्रम निर्माण होणार नाही, असाही प्रयत्न त्यांनी केला आहे. एकार्थता, अल्पाक्षरत्व, अर्थसौकर्य, सुबोधता हे निकष प्रमाण मानले आहेत.





अनुक्रमणिका

'सायबर'ला काही ठिकाणी लेखकाने 'पतत्र' हा शब्द वापरला आहे. पण 'सायबर' हीच संज्ञा मराठीत रूढ करायला हरकत नाही असेही ते म्हणतात. या प्रकरणात दीडशेपेक्षाही अधिक शब्दांना लेखकाने मराठी पर्यायी शब्द सुचविले आहेत. ते मराठीत रुळतील असे वाटते.

या पुस्तकाचे वैशिष्ट्य म्हणजे इ.स. १८०३ पासूनचा कालपट लेखकाने दिला आहे. १८०३मध्ये प्रतिलिपी करायचे जेफरसन याने बनविलेले उपकरण, १८७४चा रॅमिंग्टन टाइपरायटर इथपासून ते २०१४चा एम ३ हा जगातला सर्वात लहान संगणक इथपर्यंतचा प्रवास लेखक मांडतात. तो निश्चितच वाचनीय आहे.

हे पुस्तक लिहिण्यासाठी लेखकाने अमेरिकी ग्रंथालयांतील १२५ पेक्षाही अधिक ग्रंथांचा मुक्त वापर केला आहे. या ग्रंथांची आणि वेबसाइट्सची सूचीही दिली आहे. ती उपयुक्त तर आहेच; पण लेखकाचा व्यासंग स्पष्ट करणारी आहे. शेवटी अनेक इंग्रजी शब्दांची संक्षेपरूपे स्पष्ट केली आहेत. पारिभाषिक शब्दावलीही दिलेली आहे. हे सगळेच अभ्यासकांना निश्चितच उपयुक्त ठरणारे आहे.

पुस्तकांचे मुखपृष्ठ आशयाला अनुरूप आहेच. छपाईही उत्कृष्ट आहे. त्यासाठी प्रकाशक व मुद्रक कौतुकाला प्राप्त आहेत. पुस्तकात मुद्रणदोषही अगदी थोडे आहेत. 'माध्यमतज्ज्ञ' (पृ. १०४), 'लघुसंदेष' (पृ. १४९),' 'पुरभिलेखागार' (पृ. १५३), 'अलिक्डे' (पृ. १८४) असे मोजके शब्द सोडले तर सगळेच पुस्तक निर्दोष आहे असे म्हणता येईल.

मात्र मराठीत नवे शब्द रुळविण्याचा प्रयत्न करताना लेखकाने अनेक ठिकाणी अवघड शब्द वापरले आहेत. सायबर विश्वाची माहिती करून घेणाऱ्या सर्वसामान्य मराठी माणसाला असे शब्द नक्कीच जाचणारे आहेत. परात्मता, लक्षणा, ध्वन्यर्थ असे शब्द सर्वसामान्यांना कळायला फारच कठीण वाटतील यात शंका नाही. 'नवोपक्रम'साठी नवा उपक्रम, 'अधिमान्यसंस्कृती'ऐवजी अधिकृत संस्कृती, 'बव्हर्थप्रसवक्षम'ऐवजी बहुप्रसवा किंवा 'नमुनाप्रारूप'साठी नमुना आराखडा असे शब्द आपल्याला अधिक सोपे वाटतील. वाचक बिचकून जाईल असे काही शब्द लेखकाने वापरले आहेत. (पण ते लेखकाचा व्यासंग दाखविणारे आणि 'साहित्य विमर्श' लिहिणाऱ्या व्यक्तीचे आहेत हे सहज समजून येते.)

असे असले तरीही 'सायबरसंस्कृती' हे प्रा. रमेश बरखेडे यांचे पुस्तक आपल्याला 'सायबर-सज्ञान' करते आणि इंटरनेटची वाटचाल, समाज, संस्कृती, सायबर गुन्हेगारी, सायबोर्ग, नवी सायबर बोली अशा विविधांगी माहितीने हे पुस्तक वाचकाला श्रीमंत करते यात शंका नाही.

■





अनुक्रमणिका

# मराठी-डॉइच् (जर्मन) शब्दकोश

- आशा गुर्जर

[ परीक्षित पुस्तक : 'मराठी-डॉइच् शब्दकोश', लेखक : अविनाश बिनीवाले, प्रकाशक : महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ, मुंबई. पृष्ठे : १४+१०+६३४=६५८, मूल्य रुपये ४४२/- ]

मुम्बईच्या एल्फिन्स्टन महाविद्यालयातले जर्मन विषयाचे भूतपूर्व प्राध्यापक आणि विभागप्रमुख अविनाश बिनीवाले ह्यांचा 'मराठी'-जर्मन शब्दकोश' हा अशा प्रकारचा पहिलावहिला द्वैभाषिक शब्दकोश आहे. तो कोश हातात घेऊन त्याची पाने चाळत गेल्यावर लक्षात आले की ह्यांच्या वैशिष्ट्यांची मोजणी आकडे घालूनच करावयास हवी इतकी ती संख्येनेही अनेक आहेत आणि महत्त्वाच्या दृष्टीनेही.

मराठी भाषकांना जर्मन भाषेत चांगल्या प्रकारे लिहिता आणि बोलता यावे ह्या दृष्टीने त्यांना मदत करण्यासाठी म्हणून ह्या शब्दकोशाची निर्मिती झालेली आहे.

( १ ) ह्या शब्दकोशाचे रचनाकार/निर्माते प्रा. अविनाश बिनीवाले ह्यांनी एकट्यानेच अथपासून इतिपर्यंत हे सर्व काम केलेले असून ह्या कामासाठी त्यांना पूर्ण चाळीस वर्षे लागली. (शब्दकोश बनविण्याचे तंत्र सन १९६२ मध्ये त्यांनी डेक्कन कॉलेजच्या संस्कृत कोशप्रकल्पातून शिकून घेतले होते.)

( २ ) ह्या कोशाची तयारी त्यांनी मराठीतले कोणते शब्द घ्यावयाचे येथपासून केली. (वारंवारितेनुसार वापरात असलेल्या मराठी शब्दांची कोणतीही यादी त्या काळात नव्हतीच.) जर्मन शिकणाऱ्यांना कोणते शब्द लागतील आणि ते किती स्तरांवरचे लागतील/घ्यावेत ह्याचा त्यांनी अतिशय बारकाईने विचार केलेला आहे. (प्रत्येक शब्दाला अनेक स्तरांवरचे अर्थ असतात, उदा. 'पाणी' शब्द घेतला तर 'तो पाणी पितो', 'त्याच्या अंगात काही पाणी नाही', 'तो किती पाण्यात आहे...', 'ह्या मोत्यांचे पाणी फारच सुरेख आहे', 'तलवारीचे पाणी', 'डोळ्यांतले पाणी'... अशा प्रकारे पाणी शब्दांचे बरेच अर्थ होतात, पण जर्मनमध्ये बोलण्या/लिहिण्यासाठी मराठी भाषकाला ह्यांतले किती स्तरांचे शब्द लागतील ह्याचा विचार कोशकाराने अतिशय बारकाईने केलेला आहे.)

मराठी शब्दाला जर्मन प्रतिशब्द देतानाही अर्थाच्या स्तरांचा जो प्रश्न असतो, तोही कोशकाराने ह्याच पद्धतीने सोडविलेला दिसतो. (ह्या कामासाठी मराठी आणि जर्मन ह्या दोन्ही भाषांची फार चांगली जाण असणे आवश्यक आहे आणि प्रा. बिनीवाले

हे ह्याच दोन नव्हे; तर इतरही अनेक भाषांचे चांगले जाणकार असल्यामुळे त्यांनी हे काम फार बारकाईने व चोख केलेले आहे.)

( ३ ) मराठी शब्दाला जर्मन प्रतिशब्द देणे हे ह्या शब्दकोशाचे मुख्य कार्य आहे. हे करताना कोशकाराने परिचितापासून अपरिचिताकडे ह्या सूत्राचा अवलंब केलेला आहे, म्हणजे मराठी शब्द दिल्यावर पुढे त्याच्या जर्मन प्रतिशब्दाचा उच्चार देवनागरी लिपीत दिलेला आहे. रोमन लिपीतला शब्द अगोदर दिल्यास वाचक त्याचा वेडावाकडा (बहुधा चुकीचा) उच्चार करण्याची शक्यता आहे, हे लक्षात घेऊन प्रथम तो देवनागरीत देऊन मग रोमन लिपीत दिलेला आहे. नामे देताना त्यांचे लिंगही दाखविलेले आहे. ह्यातही एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्या शब्दात नेमका कुठे नि कसा आघात येतो हेही दाखवलेले आहे. ह्याही पुढे सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे जे उच्चार दिलेले आहेत ते प्रत्यक्षात जर्मन भाषक जसे करतात तसेच आहेत, म्हणजे उदा. क्, ट्, प् ह्या ध्वनींचे उच्चार जर्मनमध्ये शब्दाच्या आरंभी हकारयुक्त (ॲस्पिरेटिड) होतात अगदी तसेच ते दाखविलेले आहेत. (इंग्लिशमध्येही ते तसेच होतात; पण भारतात प्रकाशित झालेल्या इंग्लिशच्या एकाही शब्दकोशात ते तसे दिलेले नाहीत.) ह्या बाबतीतही हा शब्दकोश पहिलावहिलाच आहे! प्रा. बिनीवाल्यांनी जर्मन भाषेतले 'ग्लोटल-स्टॉप'सुद्धा अतिशय कौशल्याने दाखवलेले आहेत.

( ४ ) जर्मन भाषेत नामाचे लिंग आणि त्याचे बहुवचनाचे रूप मराठी-संस्कृतप्रमाणे अनियमित असते, म्हणून ते प्रत्येक ठिकाणी दाखविलेले आहे. नामाच्या लिंगवचनावरून जर्मन भाषेत क्रियापदाचे रूप बदलत नसले तरी आर्टिकल बदलते, विशेषणाचे रूप बदलते, त्यामुळे प्रत्येक नामाचे लिंगवचन माहीत असणे आवश्यक असते. हा भाग दाखवून त्याच्या पुढे त्या शब्दाचा वाक्यात उपयोग करून दाखविलेला आहे.

उदा. **घड्याळ** : ('ऊर्) : die Uhr/en - Wie spat ist es? - Ich habe keine Uhr! - किती वाजले? - माझ्याकडे घड्याळ नाही!

**मोर** : ('प्फाउ) : der Pfau/en - Es gibt sehr viele Pfauen in Rajasthan und in Gujrat - राजस्थानात आणि गुजरातमध्ये खूप मोर आहेत.

ह्यावरून प्रस्तुत शब्दकोशाची रचना आणि उपयुक्तता लक्षात येते.

ह्याच प्रकारे क्रियापदांच्या संदर्भात सुरुवातीला मूळ क्रियापद (इन्फिनिटिव्ह) देऊन पुढे कंसात त्याचे भूतकाळाचे रूप आणि पास्ट-पार्टिसिपल दिलेले आहे. वर्तमानकाळाचे रूप अनियमित असल्यास तेही दिलेले आहे, विशेष म्हणजे पूर्ण काळासाठी त्या क्रियापदाला कोणते साहाय्यकारी क्रियापद (sein किंवा haben) लागते हेही तेथेच दिलेले आहे, कारण ह्याबाबात जर्मनमध्ये नियम असले तरी त्याला अपवाद खूपच आहेत. ह्यामुळे अभ्यासकाला ताबडतोब वाक्य बनवता येणे शक्य होते.

उदा. **घरंगळणे** : '(रूट्शन्) : rutschen (rutschte, ist/hat gerutscht) - Die Alte rutschte vom Stuhl - म्हातारी खुर्चीवरून घरंगळली/घरंगळून पडली.

मराठी शब्दाचे आणि जर्मन शब्दाचे व्याकरण एकच असेल तर ते दिलेले नाही, उदा. मराठीतला शब्द विशेषण असेल तर त्यापुढच्या विशेषणवाचक जर्मन शब्दाचा विशेषण असा उल्लेख केलेला नाही. मराठी विशेषणांची रूपेही लिंग-वचन-विभक्ति ह्यानुसार बदलतात, हे दर्शविण्यासाठी त्या शब्दापुढे एक शून्य दिलेले आहे.

उदा. 'गोरा'. म्हणजे गोरा, गोरी, गोरे, गोऱ्या - वगैरे. जर्मन विशेषणांची तरतमवाचक रूपे असतात, ती मात्र तेथेच कंसात दिलेली आहेत.

**चांगला** : ('गूट्) : gut (*besser, best*)-gute Menschen - चांगली माणसं. II - Wir suchen einen besseren Regenschirm - आम्ही अधिक चांगल्या छत्रीच्या शोधात आहोत. II - Sie hat den besten Ring gefunden - तिला सगळ्यात उत्तम अंगठी मिळाली आहे.

( ५ ) जर्मन शब्दाचा उच्चार देवनागरी लिपीत अचूकपणे देता यावा ह्यासाठी प्रा. बिनीवाल्यांनी केलेली धडपड थक्क करणारी आहे. जर्मन भाषेत असे अनेक स्वर आणि व्यंजन-ध्वनी आहेत की जे मराठीत किंवा संस्कृतमध्ये नाहीत. जे ध्वनी मुळात नाहीतच त्यांच्यासाठी देवनागरीत अक्षरे असणे अर्थातच अशक्य. त्यामुळे जर्मन भाषेतले असे वेगळे स्वर आणि व्यंजन-ध्वनी दाखविण्यासाठी प्रा. बिनीवाल्यांनी नवीन अक्षरे बनविली आणि संगणकात बसवून घेतली आणि ती इतकी चपखलपणे की ती अक्षरे नवी असली तरी त्यांचे वाचन करताना कोणी अडखळणार नाही! हा खटाटोप करताना त्यांनी भारतातल्या सर्व लिप्यांचा अभ्यास केला, महाराष्ट्रातले, कर्नाटकातले गेल्या दीड-दोन शतकातले ग्रंथ मुद्रणाच्या दृष्टीने तपासले (कारण कन्नडमध्ये ए आणि ओ ह्यांचे दीर्घ प्रकारचे स्वरही असतात) आणि त्या अभ्यासाच्या आधारावर जर्मनमधल्या वेगळ्या ध्वनींसाठी वेगळी अक्षरे (८ स्वरध्वनी - ऱ्हस्वदीर्घ धरून - आणि ५ व्यंजनध्वनी) बनवून त्यांचा वापर अत्यंत सहजतेने ह्या शब्दकोशात केला. असा प्रयत्न आजवर भारतातल्या कोणाही कोशकाराने केलेला नाही. इंग्लिशचा आपल्याकडे इतका बोलबाला आहे, पण असे असूनही इंग्लिशमधल्या वेगळ्या स्वरव्यंजन ध्वनींसाठी वेगळी अक्षरे/खुणा वापरण्याचा विचारही आजपर्यंत भारतात कधीही झालेला नाही. उच्चारांचा इतका बारीक विचारच आपल्याकडे झालेल्या आत्तापर्यंतच्या शब्दकोशांनी केलेला दिसत नाही, तो ह्या मराठी-जर्मन शब्दकोशात झालेला आहे. हे केवळ संपादकीय काम नाही तर मौलिक संशोधनाचे काम आहे!

जर्मन भाषेतल्या शब्दांचे अचूक उच्चार देण्यासाठी यशस्वी धडपड करणाऱ्या प्रा. बिनीवाल्यांनी मराठीच्या उच्चारांचाही खूप विचार केलेला आहे. मराठीत च, छ, ज, झ





अनुक्रमणिका

ह्या अक्षरांचे दोन-दोन उच्चार होतात, पण ते वेगळे दाखवण्याचा प्रयत्न मराठी भाषकांनी आजपर्यंत केलेली नाही. (ह्याला एकमेव अपवाद म्हणजे नरवण्यांचा 'व्यवहार कोश' मराठीच्या इतिहासात अगदी प्रथमच प्रा. बिनीवाल्यांनी च, च; छ, छ; ज, ज; झ, झ; अशा ४ अधिक अक्षरांच्या साहाय्याने (अक्षराखाली नुक्ता देऊन) स्पष्टपणे दाखविलेले आहेत. मराठीला समर्थ ज्ञानभाषा बनवावयाची असेल तर ह्यापुढे निदान कोशसाहित्यात तरी मराठीने हे उच्चार स्पष्टपणे वेगळे दाखविण्याचा निर्णय घ्यायला हवा, असे हा शब्दकोश पाहून तीव्रतेने वाटते.

( ६ ) प्रा. अविनाश बिनीवाले जर्मनच्या जोडीने रशियनही शिकले आहेत. अनेक वर्षे ते जर्मन आणि रशियन भाषा शिकवीत होते. ह्या भाषांच्या अभ्यासामुळे आणि रोजच्या अध्यापनाच्या सरावामुळे त्यांच्या लक्षात आले, की जर्मन आणि रशियन भाषेत चतुर्थी विभक्तीबरोबर वापरली जाणारी क्रियापदे आहेत अगदी तशीच मराठीतही आहेत (उदा. येणे, वाटणे, आवडणे, जमणे, लागणे इत्यादी) पण ह्याचा विचार मराठीच्या व्याकरणांमध्ये किंव गेल्या दीड-दोनशे वर्षांच्या काळात झालेल्या मराठी-मराठी अशा एकभाषिक शब्दकोशांमध्येही कोठे केलेली आढळत नाही. अखेरीस ह्याचा पाठपुरावा करून, बारकाईने अभ्यास करून त्यांनी मराठीतल्या अशा क्रियापदांच्या वेगळ्या नोंदी केल्या आणि उदाहरणांसहित त्या प्रस्तुत मराठी-जर्मन शब्दकोशात घातल्या. अनेक भाषांच्या अध्ययनामुळे आणि अध्यापनामुळे प्रा. अविनाश बिनीवाले ह्यांना भाषांच्या संदर्भातल्या अनेक गोष्टी जाणवल्या असणार, कारण मराठीबाबत असा विचार ह्यापूर्वी कोणीही केलेला नाही हे वास्तव आहे. ह्या प्रकारचे एक उदाहरण पाहा -

**येणे** : (*चतुर्थीसह*) : ('ख्यॉनन्): konnen (konnte, hat gekonnt) - Ich kann Deutsch sehr gut - *मला* जर्मन चांगलं येतं. II - Konnen Sie auch Russisch? - *तुम्हाला* रशियनसुद्धा येतं कां? II - Kann er *schwimmen?* - *त्याला* पोहता येतं (का)? / : (ग'लिङन्) : gelingen (gelang, ist gelungen) - Es ist *ihm* bald gelungen *zu schwimmen* - *त्याला* लगेचच/लौकरच पोहता यायला लागलं. II - Es gelang *mir* leider nicht ihm *zu* helfen - *मला* दुर्दैवानं *त्याला* मदत करता आली नाही/ *मला त्याला* मदत करायला जमलं नाही.

प्रा. अविनाश बिनीवाले ह्यांचे हे निरीक्षण आणि त्याचा कोशातला अंतर्भाव इतका महत्त्वाचा आहे की ह्यासाठी त्यांचा स्वतंत्रपणे गौरव व्हावा!

( ७ ) इंग्लिश, जर्मन वगैरे भाषांमध्ये क्रियापदांची संख्या खूप आहे, तुलनेने मराठीत ती खूपच कमी आहे, पण ह्याचा अर्थ असा नाही की तशी अभिव्यक्ती मराठीत नाही. मराठीत त्याच क्रियापदाबरोबर वेगळे नाम वापरून वेगळी क्रिया

दाखविण्याची पद्धत आहे. गंमत म्हणजे आजपर्यंत क्रियापदांच्या अशा नोंदी कोणत्याही मराठी-मराठी शब्दकोशाने केलेल्या नाहीत, प्रा. बिनीवाल्यांनी मोठ्या प्रयत्नाने त्या केल्या; एवढेच नव्हे; तर त्यांना योग्य प्रतिशब्द आणि नेमकी उदाहरणे देऊन कोशाला एक नवेच परिमाण दिलेले आहे. अभ्यासकांना ह्याचा किती उपयोग होणार आहे, ह्याचा अंदाज पुढच्या एका उदाहरणावरूनही येऊ शकेल -

**कळणे** : (*चतुर्थीसह*) : मनानं, अन्त:प्रेरणेनं0-: (जिश् 'फ्यूॅलन्): sich fuhlen (fuhlte, hat gefuhlt) -Er fulte sich glucklich - आपण भाग्यवान आहोत हे *त्याला* कळलं. // बुद्धीनं0-: (फेर'श्टेऽअन्): verstehen (verstand, hat verstanden) - Hast du das Problem verstanden? समस्या (काय आहे ती) कळली आहे का *तुला*?/ / मजा0-: (डेऽन् 'श्पास् फेर्'श्टेऽअन्): den Spaβ verstehen - Er versteht keinen Spaβ - *त्याला* मजा (केलेली) कळत नाही. // माहिती म्हणून0-: ('खेनन्): kennen (kannte, hat gekannt) - Du kennst nur deinen eigenen Vorteile! - तुला फक्त आपले स्वत:चे फायदे कळतात!// योगायोगानं, कोणाकडूनतरी0-:(अेर्'फाऽरन्): - erfahren (erfahrt; erfuhr; hat erfahren) - Ich habe erfahren, Daβ - *मला* असं कळलं आहे की...II - Ich habe nichts uber ihn erfahren - *मला* त्याच्याबद्दल काहीही कळलेलं नाही. II - Ich habe von ihm erfahren, daβ du morgen nach Pune fahrst - *मला* त्याच्याकडून कळलं की तू उद्या पुण्याला जातो आहेस/ चालला आहेस(म्हणून).

अभ्यासूंनी, जिज्ञासूंनी लावणे, देणे, घेणे, करणे, असणे अशा काही क्रियापदांच्या नोंदी आवर्जून पाहाव्यात, नव्हे; अभ्यासाव्यात, म्हणजे मराठी क्रियापदाची वैशिष्ट्ये त्यांच्या लक्षात येतील, आपली मातृभाषा मराठी ही काय चीज आहे हे लक्षात येईल.

( ८ ) एखाद्या क्रियेमागचा उद्देश सांगणारी क्रियापदे (मोडल व्हर्ब) जर्मॅनिक भाषांमध्ये, विशेषत: जर्मनमध्ये खूप पद्धतशीरपणे दाखविण्याची सोय आहे. तशी आखीवरेखीव व्यवस्था संस्कृत/मराठी/हिन्दी वगैरे भारतीय भाषांमध्ये नाही, पण तशासारख्या काही गोष्टी आहेत, उदा. 'पाहिजे', 'हवा0 असणे' अशा शब्दांचा प्रयोग होतो, गंमत म्हणजे मराठी-मराठी शब्दकोशांनी ह्या शब्दांचा विचारही केलेला नाही! मराठी-मराठी शब्दकोशांमध्ये ह्या शब्दांची साधी नोंदही कोणा संपादकांनी केलेली नाही! पण प्रा. बिनीवाल्यांनी आपल्या मराठी-जर्मन शब्दकोशात ह्या शब्दांचा केवळ समावेशच केलेला आहे असे नाही तर त्यांची मराठी उदाहरणे आणि त्याचे जर्मन पर्याय दिलेले आहेत. त्यांच्या ह्या योगदानाबद्दल त्यांचे खास आभार मानावयास पाहिजेत.

( ९ ) शब्दकोश हे भाषा शिकण्याचे साधन नाही; पण शिकणाऱ्यांना मदत करणारे साधन आहे हे ह्या शब्दकोशात असलेल्या हजारो उदाहरणांवरून तीव्रतेने जाणवते. व्याकरणाची काही वैशिष्ट्ये असतील तर ती उदाहरणांमध्ये तिरक्या अक्षरांनी दाखवलेली आहेत. उदा. जर्मन भाषेत काही क्रियापदांना विशिष्ट प्रेपोझिशन लागते, अशा ठिकाणी ते तिरक्या अक्षरांनी दाखविलेले आहे तर प्रेपोझिशनना विशिष्ट विभक्ती लागते, अशा ठिकाणी ती/तिचे रूप अधोरेखित केलेले आहे. काही उदाहरणे पाहा -

**रुची असणे** : (इन्टे'रेसऽ'हाऽबन्) : Interesse haben (hat; hatte, hat gehabt) -/: (जिश् इन्टेरं' जीरन्): sich interesieren (interesierte, hat interesiert) - Haben Sie Interesse fur Schach?/ Interesieren Sie sich fur Schach? - तुम्हाला बुद्धिबळात/बुद्धिबळ खेळण्यात रुची आहे का?

इंग्लिशमध्ये interest शब्दाबरोबर in प्रेपोझिशनचा उपयोग होतो तर जर्मनमध्ये फ्यूॅर्(fur) प्रेपोझिशन वापरले जाते. हा फरक अभ्यासकांनां कळावा म्हणून येथे तो शब्द तिरक्या वळणाने दाखविलेला आहे. अशी काळजी किती शब्दकोश घेतात?

**रुचणे** : *(चतुर्थीसह)* : एखाद्याची कृति, वागणं इ.०-: (ग'फाल्न्): gefallen (gefallt; gefiel, hat gefallen) - Das hat *mir* gar nicht gefallen! - मला हे मुळीच रुचलेलं नाही!

( १० ) सुमारे दहा हजार एवढा मुख्य शब्दसंग्रह घेऊन त्यांच्या अशा प्रकारे उदाहरणांसहित नोंदी करून ६२७ पानांचा 'मराठी-जर्मन शब्दकोश' सिद्ध करणे ही काही सोपी गोष्ट नव्हती. हा कोश चाळताना तीव्रतेने जाणवलेली आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्यात दिलेल्या उदाहरणांचे वेगळेपण, त्यातली उच्च अभिरुची वगैरे.

मराठी भाषकांना जर्मन भाषेत चांगले बोलता यावे, लिहिता यावे ह्या उद्देशाने तयार केलेला 'मराठी-जर्मन शब्दकोश' असा हा पहिलाच शब्दकोश असला तरीही त्याची खरोखरच खूप वैशिष्ट्ये आहेत, त्यातली निदान काही वैशिष्ट्ये येथे उदाहरणांसहित सांगणे आवश्यक आहे. ह्या कोशात केवळ शब्दाला शब्द असे दिलेले नसून आवश्यक तेथे उदाहरणे दिलेली आहेत. ती उदाहरणे जर्मन आणि मराठी अशा दोन्ही भाषांशी प्रामाणिक आहेत ह्यात तर शंकाच नाही; पण ती दोन्ही संस्कृतींशीही प्रामाणिक आहेत. सहाशे-सत्तावीस पानांमध्ये असलेल्या उदाहरणांमधून कोशकाराची सभिरुची तीव्रतेने जाणवते. अशा ह्या समृद्ध उदाहरणांमधली काही उदाहरणे येथे देण्याचा मोह मी टाळू शकत नाही.

( १ ) भारतीय संस्कृतीशी, रामायण-महाभारताशी संबंधित असलेली उदाहरणे :

**लग्न करून घेणे/लावणे** : (फेर्' हाइराऽटन्) : (verheiraten (verheiratete, hat verheiratet) - Kunti wurde mit Pandu verheiratet

- कुंतीचं लग्न पांडूशी करून देण्यात आलं/लावण्यात आलं. (*कर्मणि*).

**पळून जाणे** : भीतीनं, घाबरून, गुपचुप०-: ('फ्लीअन्) : fliehen (floh, ist geflohen) - Pandawa und Kunti flohen aus dem Lakschagruha - पाण्डव आणि कुन्ती लाक्षागृहातून पळून गेले.

**जुळं** : ('त्स्विलिङ्): der Zwilling/e - Die beiden Bruder sind Zwillinge - ते दोघे भाऊ जुळे आहेत. II - Laxman und Shatrughna waren Zwillinge - लक्ष्मण आणि शत्रुघ्न जुळे(भाऊ) होते.

अभ्यासकांना जेव्हा जर्मनमध्ये आपल्या संस्कृतीशी संबंधित काही लिहावयाचे असेल, बोलावयाचे असेल तेव्हा अशा उदाहरणांवरून त्याला ते सोपे जाईल.

( २ ) महाराष्ट्राच्या इतिहासाशी संबंधित उदाहरणे -

**लढवणे** : खिंड, नगर इ.० - : ('फेर्'टाइडिगन्) : verteidigen (verteidigte, hat verteidigt)- Bajiprabhu Deshapande verteidigte den Pawan Paβ - बाजीप्रभू देशपांड्यांनं पावन खिंड लढवली.

**कवटाळणे** : (उम्-आर्मन्): umarmen (umarmte, hat umarmt) - Hira erreichte das Haus und umarmte ihr kleines Kind - हिरा घरी पोहोचली आणि तिनं आपल्या लहान मुलाला (छातीशी) कवटाळलं.

( ३ ) शब्दकोशाच्या संपादकांना आपल्या परिसराचे उत्तम भान असल्यामुळेच खाली आहेत अशी अनेक उदाहरणे कोशात आढळतात, ती अशी-

**धबधबा** : ('वासर्फाल्): der Wasserfall/"e - Girasappa ist der hochste Wasserfall in Indien - गिरसप्पा हा भारतातला सर्वात उंच धबधबा आहे.

**ताब्यात ठेवणे** : (ब'जेत्सन्) : besetzen (besetzte, hat besetzt - Die chinesischen Truppen besetzen noch einige Gebiete von Laddakh .- चिनी पलटणींनी लद्दाखचे काही भाग अजूनही (आपल्या) ताब्यात ठेवलेले आहेत.

**अभाव असणे** : ('माङल्न्) : mangeln (mangelte, hat gemangelt) - Es mangelt *uns an* starken Willen das verlorene Kaschmir zuruckzuerobern - एकदा गमावलेलं कश्मीर पुन: जिंकून घेण्याच्या जबरदस्त इच्छेचाच आमच्यात अभाव आहे!

( ४ ) कोणत्याही प्रकारच्या मोठ्या कामांमध्ये मुख्य कारभाऱ्याला समन्वयाची भूमिका अतिशय आवश्यक असते, ह्या कोशकाराने त्याचेही भान ठेवलेले आहे, त्याचे

पुरावे ठिकठिकाणी आहेत. त्यातले एक उत्तम उदाहरण असे आहे- जर्मनीच्या इतिहासात सन १९३३-१९४५ हा बारा-तेरा वर्षांचा काळ 'काळा काळ' म्हणून ओळखला जातो, पण नेमक्या ह्याच काळाबद्दल महाराष्ट्रात विलक्षण आकर्षण दिसतं! ह्या काळात हिटलरचे आत्मचरित्र खूप गाजले, त्याचेही महाराष्ट्रात कौतुक आहे. पण जर्मनांना ह्या गोष्टीचा विलक्षण राग आहे. हिटलर, माइन् काम्फ अशा जर्मनांना न आवडणाऱ्या गोष्टी आहेत. हे शब्दही त्यांना कुठे नको असतात आणि भारतीयांना नेमकी ह्याच गोष्टींबद्दल आस्था असते! पण अशा गोष्टी कोशकाराने किती मुत्सद्दीपणाने हाताळल्या आहेत हे पाहण्यासारखे आहे. ह्यामुळे हिटलरचे उदात्तीकरण झाले नाही आणि मराठी भाषकांना हिटलर आणि माइन् काम्फ् (Mein Kampf) हे शब्दही बघायला मिळाले!-

**झगडा** : ('खाम्फ्) : der Kampf/"e -Sein Kampf war wirklich sehr schwer - त्याच्या झगडा खरोखरच फार कठीण होता.

**संघर्ष** : ('खाम्फ्) : der Kampf/"e - "Mein Kampf" ist eine beruhmte Autobigrahie 'माइन् खाम्फ्' (माझा संघर्ष) हे एक प्रसिद्ध आत्मचरित्र आहे.

( ५ ) जाता-जाता अगदी सहजपणे, पण खरेतर नियोजनपूर्वक, आवश्यक ती माहिती सांगणारी उदाहरणे देण्याचे संपादकाचे विलक्षण कौशल्य निश्चितच वाखाणण्यासारखे आहे. प्रस्तुत शब्दकोशात अशी खूप उदाहरणे आहेत, त्यातील नमुन्यादाखल दोन उदाहरणे अशी -

**शहर** : ('श्टाट्) : die Stadt/"e -Zurich ist eine groβe Standt, aber nicht die Hauptstadt von der Schweiz - त्स्युरिश् हे मोठं शहर आहे; पण ते स्विट्झरलन्डच्या राजधानीचं शहर नाही.

ह्या उदाहरणात माहिती तर आहेच, पण स्विट्झरलन्ड शब्द जर्मन भाषेत नेहमी उपपदासह येतो आणि तो अपवादात्मक स्त्रीलिंगी शब्द आहे हेही येथे सहजपणे सांगितले आहे.

**सोमवार** : ('मोऽन्टाऽक्) : der Montag/e -Montag ist der erste Tag der Woche in Ruβ land- रशियात सोमवार हा आठवड्याचा पहिला दिवस असतो.

सामान्यत: शब्दकोशांची रचना दोन स्तंभांमध्ये असते, पण ह्या शब्दकोशात तसे नाही, ह्यात स्तंभ पाडलेले नाहीत, त्यामुळे मराठी-जर्मन शब्दकोश हातात घेतल्यावर हे वेगळेपण जरा खटकतेच. प्रथमदर्शनी हा शब्दकोश वाटत नाही, पण आत डोकावल्यावर मात्र लगेचच लक्षात येते की हा शब्दकोश दोन कॉलममध्ये करणे शक्य नाही, कारण

तसे केल्यास जवळ-जवळ प्रत्येक शब्द तुटेल, कारण जर्मन शब्द सामान्यत: खूप लांबलचक असतात आणि तसे झाले असते तर कोशाचा उपयोग करणाऱ्यांच्या दृष्टीने ते मुळीच सोयीचे झाले नसते.

सुमारे चाळीस वर्षे एकट्याने खपून प्रा. अविनाश बिनीवाले ह्यांनी हा 'मराठी-जर्मन शब्दकोश' सिद्ध केला. विद्यापीठ अनुदान मंडळ, विद्यापीठ वगैरे कोणत्याच संस्थेने ह्या कामाला मदत केली नाही. इतर कोणा संस्थेलाही ह्या कामाशी काही कर्तव्य नव्हते. मराठीच्या संस्थांना भेटल्यावर त्यांनी सांगितले की 'हे काम जर्मनचे आहे, मग आम्ही मराठी संस्थांनी ह्या परदेशी कामाला कशाला मदत करायची?' तर जर्मन संस्थांचे सूत्रधारही ह्याच चालीवर म्हणाले की 'हे काम तर मराठीचे आहे, मग आम्ही जर्मनांनी कशाला ह्याला मदत करायची?' मात्र सुदैवाने महाराष्ट्र राज्याच्या साहित्य संस्कृति मंडळाचे अध्यक्ष श्री. मधु मंगेश कर्णिक ह्यांना ह्या कोशाचे महत्त्व लक्षात आले आणि त्यांनी स्वत: लक्ष घालून तो मंडळातर्फे प्रकाशित केला.

एखादे शिवधनुष्य पेलण्यासारखेच हे काम होते. मोठ्या चिकाटीने त्यांनी हे चाळीस वर्षांत पूर्ण केले. ह्या प्रदीर्घ काळात त्यांनी घेतलेले अपार कष्ट, दीर्घकाळ टिकून राहिलेली त्यांची चिकाटी, विलक्षण कल्पकता अशा अनेक गोष्टी आपल्याला ह्या शब्दकोशात पानोपानी नव्हे; तर अक्षरश: ओळी-ओळीत जाणवतात.

मराठीतले यच्चयावत् सारे शब्द देणे हा मुळातच ह्या शब्दकोशाचा उद्देशच नाही; कारण तसा सर्वसमावेशक शब्दकोश समजा दोन हजार पानांचा झाला असता तर त्याचा उपयोग व्यवहारात किती झाला असता हा महत्त्वाचा प्रश्न आहे, त्यामुळे अमूक शब्द नाही, तमूक शब्द नाही, अमूक-तमूक उदाहरण छोटे आहे किंवा मोठे आहे असे काही सांगण्यात अर्थ नाही. क्रियापदांच्या बाबतीत तर हा शब्दकोश अप्रतीम आहे.

■





अनुक्रमणिका

# 'शून्य एक मी'

- हेमंत गोविंद जोगळेकर

[ परीक्षित पुस्तक : 'शून्य एक मी' (कवितासंग्रह)- पी. विठ्ठल, प्रकाशक कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे, पृष्ठे : १२८, किंमत : रु. १५०/- ]

पी. विठ्ठल यांच्या 'माझ्या वर्तमानाची नोंद' या नोंद घेण्याजोग्या पहिल्या कवितासंग्रहानंतर आता त्यांचा 'शून्य एक मी' हा दुसरा संग्रह आपल्यासमोर आला आहे. पी. विठ्ठल हे खाजगीकरण-उदारीकरण-जागतिकीकरण (खाउजा) नंतरच्या पिढीचे कवी. पण त्यांच्यातील बहुसंख्य कवी जसे अपरिहार्यपणे संगणकीय क्रियांची किंवा एसएमएसचीच परिभाषा वापरतात, पूर्वसुरींशी फटकून राहण्यासाठी पूर्वसुरींच्या दृष्टीने अभद्र असलेल्या भाषेतच व्यक्त होतात आणि वर्तमानातील सर्व वाईट गोष्टींचे खापर खाउजावर फोडतात, तसे काहीच पी. विठ्ठल करीत नाहीत. त्यांनाही वर्तमानाबद्दल तीव्र असमाधान आहे; पण त्यासाठी ते स्वत:लाच जबाबदार धरतात. हळूहळू मीही बनत चाललोय एक ब्रँडेड माणूस (मला कुणी बनवलेले नाही) हे त्यांना माहीत आहे. आपणच संवेदनहीन झालो आहोत (याला ते मध्यमवर्गीय होणे म्हणतात) म्हणून बेभरंवशाचे हंगाम येत आहेत. आपणच व्यवस्थेच्या रांजणात स्वत:ला (सोयीस्कर रीत्या) भिजवून घेतले आहे. आपणच आपल्या आयुष्याचे फिक्सिंग केले आहे ''नोकरी म्हणजे गाव सोडण्याचं फिक्सिंग, पैसा प्रतिष्ठा म्हणजे माणसं तोडण्याचं फिक्सिंग, उच्चशिक्षण म्हणजे खोट्या सभ्यतेचं फिक्सिंग. गेली अडतीस वर्षं फिक्सिंगच फिक्सिंग.'' असा पी. विठ्ठल अवघ्या आयुष्याचा ताळेबंद मांडतात.

पी. विठ्ठल आपल्या कवितांतून जे मांडतात ते तर्कदृष्ट्या पटणारेच असते. ''गरजांच्या शब्दकोषातच जर पेरून ठेवला असेल खजुराहो तर अनुभवाच्या हजार शब्दांचे हवन केले तरी मनातला राक्षस मरत नाही.'' तुम्ही महामार्गावर यायचं काहीच कारण नाही, तुमच्या अस्तित्वाशिवायही देश महासत्ता होऊ शकतो. कोणत्याही प्रार्थनांचे किनारे आता हाती लागतील असे वाटत नाही. मास्तर चिमुकल्या मनात श्रद्धेच्या भाकड कहाण्या पेरत असतात. म्हाताऱ्याकोताऱ्यांची समर्थ विद्यापीठं कालबाह्य झाल्यापासून कुठल्याच खाजगी वा सहकारी शाळा-कॉलेजातून संस्कारांचं शिक्षण मिळत नाही. आपण नात्यांचा सामाजिक गुंता वाढवीत असतो. आपण फक्त स्वत:च्या बायकोवर चिडू शकतो, ही त्यांची सर्व विधाने पटण्याजोगी असतात.





अनुक्रमणिका

वर्तमानाबद्दलचे असमाधान व्यक्त करताना पी. विठ्ठल कधी कधी नोस्टाल्जिकही होतात. पण त्यांना हेही माहीत आहे की चिमुकल्यांचे अवघे भावविश्व साकारणारी निरागस चित्रे आता कालबाह्य झाली आहेत. शहरात राहताना आठवणारे गावही आता पहिल्यासारखे राहिलेले नाही. अनेक गोष्टींचे यथार्थ चित्र पी. विठ्ठल सर्व बारकाव्यांसह आपल्या कवितांतून रेखाटतात. मग ते श्रद्धांजलीचे मौन पाळण्यासाठी दोन मिनिटे उभे राहणे असेल किंवा चौकातल्या सिग्नलपाशी थांबणे - सुटणे असेल. दहशती हल्ल्यातून बचावून घराकडे परतणे असेल किंवा आत्महत्येला उद्युक्त होणारा शेतकरी असेल.

नातेसंबंधाची चित्रे पी. विठ्ठल यांच्या अगदी थोड्या कवितांतून येतात. जसं शहरातल्या सजवलेल्या घरात गावाकडून रापलेला बाप येतो तेव्हा ते घर केविलवाणं दिसायला लागतं. म्हाताऱ्या बापाचं अनादी एकटेपणही ते रेखाटतात. त्यांच्या कवितेचा निवेदक जेव्हा एकटा असतो तेव्हाच त्याला बायकोशिवायचं जगणं खूप अवघड असल्याचं जाणवतं. पण या कवितांतही पी. विठ्ठल आपला कोरडेपणा सोडत नाहीत. त्यांच्यातील करुणा अधिक जाणवते जेव्हा ते आपल्या बोकडांवरच्या कवितांत बोकडाला मरण्यापूर्वी काय वाटतं ते सांगू जातात.

पी. विठ्ठल कधी कधी फॅंटसीचाही वापर करतात. जसं गटारीतून स्वच्छ पाणी वाहू लागतं - पण महासत्तेचा काळा ढग फुटल्यावर पुन्हा गटार गटारीसारखंच वाहू लागतं. किंवा ते वेगवेगळ्या कल्पना लढवतात, जसं की आपण बिग बॉसच्या घरात आहोत - आणि वेगवेगळे रोल प्ले करून त्यातील यातना जाणवून आपण ते नाही आहोत, याचं समाधान मानतात. शेवटी आपण माणूस आहोत, अशी कल्पना करतात आणि आपण माणूस नाही आहोत म्हणून सुटकेचा सुस्कारा सोडतात! भविष्यकाळात काय होईल याचेही चित्र ते उभे करतात. पण या सर्व कवितांना वास्तव वर्तमानाचा न टाळता येणारा संदर्भ आहे.

पी. विठ्ठल यांच्या कवितांत जेव्हा आदिम प्रतिमा येतात तेव्हा त्या आदिमच असतात. जशी नदी संस्कृतीचा अव्याहत झरा असते. किंवा माती माणसांना माफ करीत नाही. नियमित आलेल्या पावसाकडे गावातील आणि शहरातील माणसं वेगवेगळ्या दृष्टिकोनांतून पाहतात. पण काजवे त्यांना बंद डोळ्यांसमोरच्या स्तनांसारखे भासतात!

निराधार करून सोडणाऱ्या वर्तमानात पी. विठ्ठल यांना आधार कशाचा वाटत असेल तर तो आहे कवितेचा. तिच्याबद्दल लिहिताना ते रोमॅंटिक होतात. कविता माणसांच्या स्वप्नांत खोल दडलेली असते म्हणून आपण एखादी कविता लिहूया असा आशावाद ते बाळगू शकतात. कवितेतून माणसाच्या भाषेचं आदिम दु:ख मांडण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा आहे. ते तर्कशुद्ध कविता लिहीत असले तरी आपल्याला शब्दामागचा अदृश्य अर्थ शोधता यावा, केवळ तर्काच्या खुंटीवर उभे राहून चालणार नाही असे





अनुक्रमणिका

त्यांना वाटते. शुभ्र कोरे पांढरे कागद पाहून त्यांना खूप खूप लिहावेसे वाटते.(ते जरी लिहीत नसले तरी) सहवासातील प्रिय व्यक्तीबद्दलही त्यांना खूप खूप लिहायचंय; पण अक्षरं कागदावर उमटत नाही आहेत! जगण्याच्या तत्त्वज्ञानाचा समर्थ अनुवाद आपण उतरवू शकत नसलो तर कविता ही खूप नंतरची गोष्ट आहे असे त्यांना वाटते. आपण उधळत असलेल्या उपदेशाच्या मुक्ताफळांना कधीतरी बीजं फुटतील आणि त्यांना क्रांती म्हटले जाईल हे स्वतःचे केलेले फडतूस समाधान वाटते. जगताना कवितेसारखी निष्क्रियता माणसाला परवडणार नाही याचेही त्यांना भान आहे. तरीही कविताच त्यांचा आधार आहे!

इतर कवींच्या कवितांतील संदर्भही पी. विठ्ठल यांच्या कवितांतून येतात. मर्ढेकरांप्रमाणे अनेक मुंग्या त्यांच्या कवितेत येतात; पण ते या समस्येच्या मुंग्यांना सांभाळणारे वारूळ होतात! भुजंग मेश्राम यांच्या कवितेतील 'शेपूट गेलं तुझं, राहिलं रे अभिजात माकडहाड'चा उल्लेख ते करतात. कोलटकरांच्या कवितेतील 'काय डेंजर वारा सुटलाय' मनात ठेवून पी. विठ्ठल बदलत्या अभिरुचीच्या डेंजर वाऱ्यावर कविता लिहितात- त्यात भूतकाळातील साहित्यिकांच्या पार्श्वभूमीवर आजचे मार्केट फुल्ल करणारे चलनी लेखक येतात!

या संग्रहातून प्रकर्षाने जाणवते ती शून्यत्वाची जाणीव. माणूस मेल्यावर उरते काय तर शून्य. म्हणून 'शून्य शून्य अवकाशातील आपण सारे शून्य' या निष्कर्षापर्यंत पी. विठ्ठल येऊन पोचतात. वर्तमान विपरीत आहे आणि आपण ते बदलू शकत नाही आहोत ही हतबलता त्यांच्या कवितांतून जाणवते. पण हा एकच आशय त्यांच्या अनेक कविता वेगवेगळ्या तऱ्हेने किंवा एकाच तऱ्हेने गिरवीत राहतात, तेव्हा एक तोचतोचपणा जाणवतो. आजच्या कवितांच्या गर्दीत पी. विठ्ठल यांची कविता वेगळी आहे, तर्कशुद्ध आहे आणि आश्वासकही आहे. 'मी एक शून्य' असे ते म्हणत असले तरी या संग्रहाचे नाव त्यांनी 'शून्य एक मी' असे ठेवले आहे. कदाचित या मागे शून्याकडून एकाकडे, एकाकडून 'मी'कडे आणि पुढे 'मी'कडून अनेकांकडे जाण्याची गर्भित इच्छा असावी.

शुभ्र कोऱ्या पांढऱ्या कागदावर त्यांना जी कविता 'लिहायचीच' आहे ती लिहिण्यासाठी ते वाट बघत असलेला ऋतू त्यांच्या मनात उतरण्याची आपणही वाट बघू या!



# कालिदास आणि शाकुंतल : एक अर्घ्यदान

- सुप्रिया सहस्रबुद्धे

[ परीक्षित पुस्तक : 'कालिदास आणि शाकुंतल : एक अर्घ्यदान' लेखक : त्र्यं. वि. सरदेशमुख, प्रकाशक सुविद्या प्रकाशन, सोलापूर, प्रथमावृत्ती - कालिदास-दिन, २८ जून २०१४, पृष्ठे : ६८, किंमत रु. ७०/- ]

इये मराठीचिये नगरीमध्ये वाचन संस्कृती पार लयाला चालली आहे, मराठी वाचन तर नामशेष होणार, असे भय व्यक्त होत आहे. आपले प्रकाशनच नव्हे; तर एकूणात प्रकाशन-व्यवसायच लवकरच नष्ट होणार आहे, असा वेदवाणीसारखा उद्घोष काही कोपऱ्यांमधून ऐकू येतो आहे. अशा एकंदर वातावरणात ''आयुष्यात पुस्तके येवोत, त्यानिमित्ताने असे निर्भेळ ऋणानुबंधही, ज्यातून दिवसेंदिवस भेसूर होत चाललेल्या या जगात आयुष्यावरचा विश्वास कायम राहावा यासाठी सर्वांना मन:पूर्वक शुभेच्छा.'' अशा शब्दांची शुभवाणी वाचायला मिळणे हा मनाला भरून व भारून टाकणारा दुर्मीळ योग आहे. तो एका साठपेक्षा कमी पानांच्या वार्षिक नियतकालिकात मिळाला. अभिनव संकल्पना असलेल्या या वार्षिक नियतकालिकाविषयी आपण निदान जाणून तरी घ्यायला हवे.

२३ एप्रिल हा विल्यम शेक्स्पीअरचा जन्म व मृत्युदिन जागतिक ग्रंथ व लेखन हक्क दिन म्हणून साजरा केला जातो, हे सर्वांना माहीतच आहे. सोलापूरच्या नितीन वैद्य यांच्या आशय परिवाराचा 'आशय' हा वार्षिक अंक २३ एप्रिल या दिनाला काढला जातो. त्यात जाहिरातींचा कणही नसतो. पन्नास-साठ पानांचा ऐवज व स्वतंत्र पुस्तक होऊ शकेल, अशी ऐपत असलेला एकच एखाद्या श्रेष्ठ ग्रंथाविषयीचा दीर्घ लेख असतो. आजूबाजूला इतर भाषांतील काही अभिजात कवितांच्या अनुवादाचे उतारे असतात. बस्स, फक्त एवढंच. पण याचे मोल पुस्तकप्रेमीच जाणू शकतील.

२०१८चा फक्त एकच अंक पाहायला मिळाला. हा बाराव्या वर्षाचा अंक आहे. म्हणजे त्याने एक तप पूर्ण केले आहे. हे 'वाचनतपस्वी' प्रकाशनच म्हणायला हवे. या एकाच अंकावरून संकल्पनेचे स्वरूप लक्षात येते. या अंकात सुरुवातीला मराठीतील पहिल्या ज्ञात शिलालेखाचा मजकूर व त्याचे चित्र आहे. ... सोलापूरजवळील हत्तरकुडलसंगम येथील मंदिरातील तुळईवर कोरलेला आहे. त्याची अंकातील कालसमर्पकता





अनुक्रमणिका

विलक्षण आहे. कारण सध्या त्याची सहस्राब्दी चालू आहे आणि शिलालेखाच्या शेवटच्या ओळीचा अर्थ 'वाचणारे विजयी होवोत' असा आहे!

या अंकात 'अक्षर पाविजे निधरि' हा डॉ. आनंद जोशी यांचा सेहेचाळीस पानांचा लेख आहे. हर्मन मेलविल या अमेरिकन लेखकाच्या 'मोबि डिक' या अमेरिकन पुनर्जागरणाला मोठे योगदान देणाऱ्या कादंबरीच्या श्रेष्ठत्वाचा परिचय व प्रत्यय देता देता साहित्याच्या प्रदेशात केलेला मुक्त संचार - पण भरकटणे नव्हे - असे या लेखाचे स्वरूप आहे. मोबि डिकला लेखकाच्या मृत्युनंतर विसाव्या शतकात 'महान अमेरिकन कादंबरी' असे बिरूद मिळाले. नोबेल विजेत्या विल्यम फॉकनेरने अशी कादंबरी आपल्याकडून लिहिली जायला हवी होती, असे म्हटले. डी. एच. लॉरेन्सने तिचा 'जगातले सर्वात विलक्षण पुस्तक आणि समुद्रावरची तर सर्वश्रेष्ठ कादंबरी' असा गौरव केला. तिच्याविषयीच्या डॉ. आनंद जोशींच्या या लेखाचा पूर्वार्ध असलेला 'वाचनाचेनि आधारे' हा लेख २०१५च्या 'ग्रंथदिन' या अंकात प्रसिद्ध झाला होता. त्याला मोठा प्रतिसाद मिळाला. कानडी कवी आनंद झुंजुरवाड यांनी त्याचा कानडी अनुवाद केला आणि दोन वर्षांत बेंगळुरूच्या अंकिता पब्लिशर्सकडून त्याचे पुस्तक होऊन तिथल्या इंटरनॅशनल कल्चरल सेंटरच्या सभागृहात कानडी कवी वेंकटेशमूर्ती यांच्या हस्ते त्याचे थाटात प्रकाशनही झाले.

त्र्यं. वि. सरदेशमुख यांचे 'सृजनधर्मी लेखनाचे एकांत तप आचरणारे विरळ प्रतिभावंत लेखक' असे सार्थ वर्णन केले जाते. २०१७च्या 'ग्रंथदिन' अंकात त्यांचा 'कालिदास आणि शाकुंतल : एक आकलन' हा दीर्घ लेख प्रसिद्ध झाला होता. त्याचे देखणे पुस्तक २०१७च्या कालिदास-दिनाला प्रकाशित झाले. सरदेशमुखांनी फक्त अडुसष्ट पानांत कालिदासाच्या साहित्याच्या व 'शाकुंतला'च्या गाभ्याचे विनम्रतेने पण सूक्ष्म रीतीने सखोल विश्लेषण केले आहे. त्यांचे एक वाक्य उद्‌धृत करायलाच हवे, असे वाटते. ''व्यास-वाल्मीकि-भर्तृहरी-भास-भवभूती-कालिदास-तुलसीदास-वामन-मोरोपंत-तुकाराम-नामदेव-ज्ञानदेव-एकनाथ-रामदास यांच्या आठवणीचे आणि व्यासंगाचे श्रद्धार्पण महाराष्ट्र करणार नसेल तर उरल्यासुरल्यांनी आपण आचंद्रसूर्य यशस्वी कीर्तिमान होऊ याचा विश्वास कशाच्या बळावर वागवावा, मला कळत नाही.''

अशा लेखांचे महत्त्व व आंतरिक गुणवत्ता यावरून लक्षात येईल, असे हे वाचनमय नियतकालिक आहे.

मराठीत असे काही घडते आहे, ही मोठा दिलासा देणारी गोष्ट आहे.

■

